# HISTORY OF THE
# MARATHAS,



## IN EASY VERSE.

# मराठ्यांच्या इतिहासावर

लहान मुलां करितां

# सोपी कविता.

परशुरामपंत गोडबोले

ह्यांनीं केली.



ती

ज्ञानप्रकाश छापखान्यांत छापली.

मुक्काम पुणें.

शके १७८५

सन १८६४



किंमत आठआणें.

# प्रस्तावना.

मराठ्यांच्या इतिहासावर कांहीं कविता असावी असें मनांत आल्यावरून मराठ्यांची लहान बखर व मोठी बखर ह्यांतील मुख्य मुख्य गोष्टी घेऊन मुलांस सहज समजण्याजोगी सोपी कविता केली आहे. हींत आर्या, श्लोक, ओंव्या, साक्या, दिंड्या, अभंग, गीत, असे कवितांचे प्रकार रचले आहेत. व शेवटीं एक पोवाडा करून घातला आहे. ह्यांत सातारचे राजे आणि पेशवे ह्यांचें संक्षेपानें वर्णन केलें आहे. इतर देशांतील गैर-माहितीच्या राजांच्या वर्णनापेक्षां आपल्या महाराष्ट्र देशांतील राजांचें वर्णन इकडील लोकांस अधिक आवडतें. कारण कीं ते कोण कसे त्यांनीं काय केलें इत्यादि गोष्टी वारंवार लोकांच्या मुखानें प्रसंगविशेषीं कानीं पडतात, ह्यावरून त्यांची माहिती झाली असते. त्यांच्या वर्णनाची कविता महाराष्ट्र देशीय लोकांस आवडेल असें वाटतें.

# अनुक्रमणिका.



## पेशव्यांचा इतिहास.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | ५ | यवनाच्या | यवनांच्या |
| १ | ३ | हिंदूतें | हिंदूंतें |
| ५ | ९ | प्रांताचें | प्रांतांचें |
| ६ | ६ | एकातीं | एकांतीं |
| १३ | २१ | सेवकाला | सेवकांला |
| १७ | १२ | साताच्या | सातांच्या |
| २० | २१ | तेव्हा | तेव्हां |
| २६ | ९ | ब्राम्हण | ब्राह्मण |
| २९ | १८ | तयात | तयांत |
| ३४ | ७ | राज्याच्या | राजाच्या |
| ३७ | २ | भाउसाहब | भाउसाहेब |
| — | ५ | कामात | कामांत |
| — | १४ | हिंदुस्थानात | हिंदुस्थानांत |
| — | १५ | स्पाऱ्या | स्वाऱ्या |
| — | १९ | मराठ्याच्या | मराठ्यांच्या |
| — | २१ | अफगाणाचा | अपगाणांचा |
| ३८ | १० | सहाजणामध्यें | सहाजणांमध्यें |
| — | १९ | अफगाणाचा | अफगाणांचा |
| ३९ | ४ | मराठे यांचा | मराठियांचा |

| पृष्ठ. | ओळ. | अशुध्ध. | शुध्ध. |
| --- | --- | --- | --- |
| ४० | १३ | अनकूळ | अनुकूळ |
| ४२ | ६ | भोंवती | भोंवतीं |
| ४२ | १२ | अन्न सामग्री | अन्नसामग्रीं |
| ४७ | १२ | वास्वाणिती | वाखाणिती |
| ५३ | ८ | उभयताच्या | उभयतांच्या |
| ५५ | १३ | भिरवत | मिरवत |
| — | १६ | सदन | सनद |
| ६० | ६ | स्वातंत्र | स्वातंत्र्य |
| ६१ | ७ | शिलगणास | शिलंगणास |
| — | १२ | पचविसाव्या | पंचविसाव्या |
| ६४ | २ | समजलें तें त्यास॥ फार | समजलें ॥ तें त्यास फार |
| — | ५ | एसे | ऐसें |
| — | ६ | यशोबाई | यशोदाबाई |
| ६७ | ३ | माल्य नकरी | मान्य नकरी |
| ६८ | ४ | पाठीं लागले | पाठीलागले |
| ६९ | ११ | माहाद्दारापुढें | महाद्वारापुढें |
| ७० | १२ | करुनि | करुनी |
| ७२ | ४ | विद्याचें | विद्येचें |
| — | ८ | यावरकरानजरक्षमातळीं | यावरनजरकरा ॥ |



# शिवाजी राजाचें वर्णन.

---

( इसवी सन १६४६ पासून सन १६८० पर्यंत )

**आर्या.**

राज्य मराठे यांचें स्थापित केलें मुळीं शिवाजीनें ॥
यवनांच्या राज्यावर बैसविले हक्क त्याच गाजीनें ॥ १ ॥
त्या पुरूषाचें वर्णन सुकवीस करावयास योग्य असे ॥
कीं त्या समान दुसरा कोणी हिंदूंत जाहलाचि नसे ॥ २ ॥
त्याचें चरित्र सारें बघतां वर्णावया असे भारी ॥
विस्तारातें टाकुनि थोड्यांतचि आणितों कथा सारी ॥ ३ ॥
प्रख्यात शिवाजीचे पूर्वज उपनांव भोंसले ज्यांचें ॥
पहिलें रहावयाचें होतें वेरूळ गांव तें त्यांचें ॥ ४ ॥

**ओंव्या.**

प्रख्यात क्षेत्र वेरूळ ॥ दौलताबादेपासून जवळ ॥
जेथें कोरींवलेणें अतुळ ॥ प्रसिद्ध असे ॥ ५ ॥
भोंसल्यांच्या वंशामाजी ॥ होता एक पुरुष मालोजी ॥
त्याचा पुत्र शाहाजी ॥ जो जनक शिवाजीचा ॥ ६ ॥

---

## आर्या.

गंभीर शूर मोंगल पहिल्यानें पश्चिमेकडुनि आले ॥
हिंदुस्थानामध्यें हिंदूतें लढुनि जिंकिते झाले ॥ ७ ॥
दिल्लीच राजधानी करुनि तिथे राहिले धरुनि गर्व ॥
म्हणती मनांत झालें हें हिंदुस्थान आमुचें सर्व ॥ ८ ॥
त्यांच्या वंशांत पुढें झाला सुत जो शहाजहानाला ॥
तो तक्तावर बसला म्हणती औरंगजेब जन त्याला ॥ ९ ॥
तो शूर चतुर गुणवान् राज्यकरी धरुनियां बरी नीती ॥
पाळी सेना अगणित पाहुनि त्या शत्रु घेति मनिंभीती ॥ १० ॥
अभिमान फार त्याला जातीचा आणखी स्वधर्माचा ॥
यास्तव परधर्माचा द्वेष करी त्यांत फार हिंदूंचा ॥ ११ ॥
त्याच्या पदरीं मोठे मोठे सरदार शूर बहु असती ॥
होतागुणज्ञ म्हणउनि बहुत गुणीही तदाश्रयें वसती ॥ १२ ॥
त्यासरदारांमध्यें मालोजी भोंसला म्हणुनि एक ॥
होता सरदार करी स्वामीची चाकरी धरुनि नेक[१] ॥ १३ ॥
तो मालोजी होता पूर्वी आश्रित शहाजहानाचा ॥
पदवी देउनि केला मोठा त्यानेंच तो लहानाचा ॥ १४ ॥

## ओंव्या.

शिंदकेरच्या जाधवास ॥ भीड घालूनियां सायास ॥
आपला पुत्र शहाजी यास ॥ कन्या त्याची देवविली ॥ १५ ॥

---

१ प्रमाणिकपणा. २ प्रयत्नानें.

निजामशाही कडून काम ॥ जाधवाकडे होतें कायम ॥
चालत होता सरंजाम ॥ दहा हजार फौजेचा ॥ १६ ॥
त्याच सरकाराकडून ॥ मालोजीस सन्मानें करून ॥
पुणें आणि सुपें हे दोन ॥ प्रांत जाहगीर मिळाले ॥ १७ ॥
चाकण आणि शिवनेरी ॥ ह्या किल्यांची किल्लेदारी ॥
मालोजी याला नोकरी ॥ प्रांतां सुद्धां मिळाली ॥ १८

## आर्या.

बुडतां निजामशाही शहाजि हा मोंगलांकडे गेला ॥
त्याचा दिल्लीपतिनें सन्मान पित्याहुनी अधिक केला ॥ १९ ॥
मालोजी मेल्यावर त्याचा अधिकार बादशाहानें ॥
तोच शहाजीस दिला तोहि करी चाकरी इमानानें ॥ २० ॥
मग कांहिं कारणानें गेला दिल्लीपतीस सोडून ॥
[2]तो विजय[3]पुरपतीचा राहे आश्रय सदैव जोडून ॥ २१ ॥
बापानें मेळविले होते जे ते असून त्यांहून ॥
प्रांत अधिक मेळविले त्यानें करनाटकांत जाऊन ॥ २२ ॥

## ओवी.

त्या शहाजीचा पुत्र शिवाजी ॥ सन सोळाशें सत्ताविसांमाजी ॥
जन्मास पावला तो गाजी ॥ शिवनेरी किल्यांत ॥ २३ ॥

## आर्या.

शिवनेरींत उपजला म्हणुनि शिवाजी असें तया नाव ॥

---

१ मालोजी पेक्षां. २ शहाजी. ३ विजापुरकराचा.

ठेविति हा अवतारी ऐसा चित्तांत धरिति जन भाव ॥ २४ ॥
बाळपणांतचि त्याची कृतिमति[1] पाहुनि विलक्षणा वाटे ॥
होइल पराक्रमी हा जिंकुनि लावील शत्रुला वाटे ॥ २५ ॥

### ओंवी.

करनाटकांत कराया स्वारी ॥ शहाजी निघाला ते अवसरीं ॥
कुटुंबाचीं माणसेंसारीं ॥ पुणेमुकामीं ठेविलीं ॥ २६ ॥

### आर्या.

होता दिवाण त्याचा दादोजी कोंडदेव नामानें ॥
त्याच्या करीं निरेविला पुत्र शिवाजी शहाजिनें मानें[3] ॥ २७ ॥

### श्लोक.[2]

आहे फारचि हूड हा चपळही सांभाळ याचा करा ॥
शिक्षा लावुनि नीट यास वळवा नाहीं उणें चाकरा ॥
आहे भार तुम्हांवरीच अवघा याला विसंबू नका ॥
ऐसें सांगुनि जाय सैन्य सह तो स्वारीस कर्नाटका ॥ २८ ॥

### ओंव्या.

होता दादोजी शिकवित ॥ तरी नमानी तयाचें उक्त ॥
शिवाजी त्यास नकळत ॥ कृत्यें करी अचाट ॥ २९ ॥
एकोणीस वर्षें वयाला ॥ झालीं नाहींत तोंच निघाला ॥
मिळवुनियां सैन्याला ॥ तोरणा किल्ला जिंकिला ॥ ३० ॥

---

१ कर्म व बुद्धि. २ स्वाधीन केला. ३ आदरानें.

दिंडी.

म्हणे दादोजी तदा शिवाजीला ॥ असें करणें हें योग्य नसे तुजला॥
विदित झालें जरऽऽदशाह यांला॥तरी होइल सर्वस्वनाश अपुला॥३१

श्लोक.

दादोजिनें यापरि बोध त्याला ॥ केला तरी यत्न निरर्थ झाला ॥
थारीं नसे जीव सदा तयाचा॥कीं बोल लागेल म्हणे धन्याचा॥३२॥

आर्या.

बहुधा या चिंतेनें दादोजी मरण पावल्या मागें ॥
तो अपल्या प्रांताचें जातीनें काम चालवूं लागे ॥ ३३ ॥

ओंव्या.

विजापूरच्या अमलांतले ॥ पुरंदर आणि दुसरे किल्ले ॥
युक्ति प्रयुक्तीनें घेतले॥ शिवाजीनें नंतर ॥ ३४ ॥
दिली विजापूर यांच्या मुलखांत॥ लूटकरून असंख्यात ॥
शिवाजीनें अतित्वरित॥ आपली सत्ता वाढविली ॥ ३५॥
घाटमाथा प्रांत मावळ॥ तेथील रहिवासी लोक सबळ ॥
शूर पाहोनि पायदळ ॥ सैन्य त्यानें जमविलें ॥ ३६ ॥
सनसोळाशें अठ्ठेचाळीस ॥ तें कल्याण सुभा घ्यावयास ॥
यत्न केला परितो सिद्धीस ॥ गेला नाहीं त्या काळीं॥ ३७ ॥

आर्या.

होतां वृद्धिंगत तो विजयपुरपती करी विचारास ॥
धाडूनि सैन्य सत्वर मारावें धरुनि बंडखोरास ॥ ३८ ॥

ओवी.

अफजूलखान सरदार ॥ सैन्यासहित महाशूर ॥
पाठविला शिवाजीवर ॥ युद्ध कराया त्या पूर्वे ॥ ३९ ॥

साकी.

शिवाजिनें मग मनीं आपल्या कपटी विचार केला ॥
खलबत करण्याच्याच मिसानें तो एकांतीं नेला ॥ ४० ॥
तें खानाला खरें वाटलें बोलत बसले दोघे ॥
मारुनि वाघनखें खानाचा प्राणचि सहसा [1]तो [2]घे ॥ ४१ ॥

आर्या.

मारुनि त्या खानाला त्याच्या सैन्यास पळविलें दूर ॥
कपटी ह्मणोत कोणी त्यास परि असे खराच तो शूर ॥ ४२ ॥

साक्या.

सोळाशें चौसष्टीं त्याचा बाप शहाजी मेला ॥
त्या वर्षीच शिवाजी राजा ह्मणवुनि घे अपणाला ॥ ४३ ॥
अपल्या नावाची एक नवी टांकसाळ ही केली ॥
शिवछत्रपती ऐशी मुद्रा तांब्याची पाडविली ॥ ४४ ॥
तेव्हां पासुनि शिवराई हे पैसे प्रसिद्ध झाले ॥
व्यापारांत अजून तें नाणें त्याच्या देशीं चाले ॥ ४५ ॥

आर्या.

केलें शिवाजिरायें गादीचें स्थान मुख्य रायगड ॥

---

१ शिवाजी. २ घेतला.

कीं शत्रूस पडावें समर्थी जिंकावयास फार जेड ॥ ४६ ॥
सह्याद्री वरि केले किल्ले बहुताचि नवे शिवाजीनें ॥
जे दुर्गम मनुजांला[3] लंघावे[4] केवि त्यांशि वाजीनें[5] ॥ ४७ ॥

ओंवी.

त्यांमाजी मुख्य दोन गड ॥ रायगड आणि प्रतापगड ॥
ते फारची अवघड ॥ चढावयास ॥ ४८ ॥

आर्या.

तो जळमार्गानें मलबार प्रांतावरी करी स्वारी ॥
गुर्जर देशीं जाउनि लुटिली सूरतहि दोनदां सारी ॥ ४९ ॥
सेना नेउनि हुबळी नामक संपन्न शहर तें लुटिलें ॥
आले विघ्न कराया जे कोणी त्यांस धरुनियां कुटिलें ॥ ५० ॥
सांपडली जशि तेथें तैशी कोठें न गवसली लूट ॥
तेव्हां पासुनि नाहीं पडली द्रव्यास किमपिही तूट ॥ ५१ ॥

ओंव्या.

भाऊ व्यंकोजी या पासून ॥ आपला विभाग घ्यावा म्हणून ॥
आणि विजापूरकराचे मुलखांतून ॥ लूट बहूत आणावी ॥ ५२ ॥
ह्या दोन गोष्टी साधावया ॥ शिवाजी निघाला जावया ॥
कर्नाटकीं तेव्हां तया ॥ सवें फौज अपार ॥ ५३ ॥
चाळीस सहस्र पायदळ ॥ तीस हजार अश्वबळ ॥
बाजारबुणगे या वेगळ ॥ त्याची गणती असेना ॥ ५४ ॥

---

१ कठिण. २ अवघड. ३ मनुष्याला. ४ चढून जाणें. ५ घोड्यानें.

ऐशिया सैन्या सहित ॥ जाऊनि दक्षिण देशांत ॥
आपले दोन्ही मनोरथ ॥ सिद्धीस नेले त्या शूरें ॥ ५५ ॥

आर्या.

त्याच्या परिभवाची[1] विजापुरकरांस शक्ति तो नवती ॥
परि दिल्लीच्या पतिनें धरिली परिभव करावयास मती[2] ॥ ५६ ॥
दिल्लीपतिच्या मुलखीं सतत स्वाऱ्या करीत तो गेला ॥
अवरंगजेब यास्तव त्यावर चित्तांत फार रागेला ॥ ५७ ॥
जयवंतसिंग नामा मोठा सरदार त्यास बोलविलें ॥
तत्काळ शिवाजीवर सेना देउनि तयास पाठविलें ॥ ५८ ॥
येउनि दक्षिण देशीं युद्ध कराया शिवाजि वर गेला ॥
जाणुनि अजिंक त्यानें सामोपायें करून वश केला ॥ ५९ ॥
मी शरण बादशाहा प्रति जाउनि त्या समीप राहीन ॥
आज्ञा करील तेव्हां पुनरपि दक्षिण दिशेस पाहीन ॥ ६० ॥
बोलून शिवाजीनें सरदाराशीं[3] करार हा केला ॥
दिल्लीस बादशाहा प्रति भेटाया निघून [4]तो गेला ॥ ६१ ॥

ओव्या.

संन सोळाशें सासष्टांत ॥ शिवाजी पोंचला दिल्लींत ॥
कांहीं नभितां चित्तांत ॥ अवरंगजेबास भेटला ॥ ६२ ॥
तेथें त्याच्या इच्छेप्रमाणें ॥ सन्मान केला नाहीं बादशाहानें ॥
म्हणून कांहीं दुरुत्तरानें ॥ बादशाहाला बोलला ॥ ६३ ॥

१ पराभव. २ बुद्धी ३ जयवंतसिंगाशीं. ४ शिवाजी.

परि तो चित्तीं भय पावला ॥ कीं कैद करील हा मला ॥
म्हणून गुप्त रूपें निघाला ॥ परत आला दक्षिणे ॥ ६४ ॥

आर्या.

मग अवरंगजेबानें कांहीं मतलब मनांत आणून ॥
दिधलाच शिवाजीला राजा ऐसा किताब जाणून[२] ॥ ६५ ॥

ओंव्या.

औरंगजेब आणि विजापूरकर ॥ यांचा चालला असतां समर[३] ॥
ती संधि पाहून सत्वर ॥ स्वार्थ साधी शिवाजी ॥ ६६ ॥
औरंगजेबाचा हुकूम घेऊन ॥ विजापूर करापासून ॥
चौथाई, सरदेशमुखी हे दोन ॥ हक्क घेण्याचे ठरविले ॥ ६७ ॥
ते कर होतां हस्तगत ॥ सन सोळाशें सत्तरांत ॥
दिलासुभा खानदेश यांत ॥ ते दोन्ही हक्क बसविले ॥ ६८ ॥
ऐसा शिवाजी राजा चतुर ॥ पदरीं सरदार महाशूर ॥
त्यांकडे सोपून कार्यभार ॥ दृढ केलें स्वराज्य ॥ ६९ ॥
पेशवाईच्या अधिकाराला ॥ शामराज पंत नेमिला पहिला ॥
मोरोपंत पिंगळा मग केला ॥ शिवाजीनें पेशवा ॥ ७० ॥
पहिला तान्हाजी मालुसरा ॥ येसाजी कंक हा दुसरा ॥
बाजी फसलकर तिसरा ॥ हे बाळमित्र शिवाजीचे ॥ ७१ ॥
हे लढाया जिंकून विजयी झाले ॥ शिवाजीच्या फार कामीं आले ॥
म्हणवून त्यांस मोठाले ॥ अधिकार दिले शिवरायें ॥ ७२ ॥

---

१ बादशाह. २ समजून बुद्ध्या. ३ युद्ध.

होता प्रतापराव गुजर ॥ घोडेस्वारांचा मुख्य सरदार ॥
सेनापती त्याच्या मरणानंतर ॥ झाला हंबीरराव मोहिता ॥ ७३ ॥
जे जे प्रांत शिवाजीनें ॥ जिंकून घेतले पराक्रमानें ॥
त्यांच्या वसुलाचें काम त्यानें ॥ अबाजी सोनदेवास सांगितलें ॥ ७४ ॥
ऐशी राज्यव्यवस्था केली ॥ अष्टप्रधान मंडळी स्थापिली ॥
त्यांचीं नावें आणि कामें योजिलीं ॥ तीं सांगतों ऐकावीं ॥ ७५ ॥

## अष्टप्रधान.

पहिला पेशवा मुख्य प्रधान ॥ त्यास दिवाणगिरीचें काम सांगून ॥
दुसरा पंत अमात्य प्रधान ॥ सर्व जमाखर्च त्याकडे ॥ ७६ ॥
तिसरा केला पंत सचिव ॥ त्याकडे दप्तर दिधलें सर्व ॥
चवथ्याचें मंत्री हें नांव ॥ शिबंदीचें काम त्याकडे ॥ ७७ ॥
पांचवा केला सेनापती ॥ तो सर्व सैन्याचा अधिपती ॥
सहावा सुमंत सुमती ॥ परराज्य संबंधी काम त्याकडे ॥ ७८ ॥
सातवा न्यायाधीश निष्काम ॥ न्याय करण्याचें त्याकडे काम ॥
आठव्याचें पंडितराय हें नाम ॥ शास्त्रार्थ त्यानें सांगावा ॥ ७९ ॥
ऐसा शिवाजी राजा प्रतापी ॥ जो मराठ्यांचें राज्य स्थापी ॥
शत्रूस घाली जो ठोपी ॥ तोही काळा वश झाला ॥ ८० ॥
असतां सन सोळाशें ऐंशी ॥ मृत्यूचें बोलावणें झालें त्यासी ॥
तत्काळ ठेवूनि देहासी ॥ परलोका पावला ॥ ८१ ॥

## श्लोक.

त्रेपन्नावें वर्ष त्याच्या वयाला ॥ तेव्हां होते पुत्रही दोन त्याला ॥

संभाजी हें नांव त्या थोरल्याचें ॥ होतें राजा राम हें धाकट्याचें ॥८२॥

आर्या.

सामान्य मराठ्यांच्या वंशीं उपजोनि त्या शिवाजीनें ॥
स्वपराक्रमें मिळविलें राजा हें पद जनांत गाजीनें ॥ ८३ ॥

---

## संभाजी राजाचें वर्णन.

(इसवी सन १६८० पासून १६८९ पर्यंत )

साकी.

शिवाजि मेल्या नंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र संभाजी ॥
बसला गादीवरि परि त्याला लोक न झाले राजी ॥ १ ॥

ओंव्या.

तो शिवाजी सारखा शूर ॥ परि स्वभावानें अति क्रूर ॥
दुर्व्यसनी आणि त्रास कर ॥ होता सर्व लोकांतें ॥ २ ॥
यास्तव कंटाळून संभाजीस ॥ त्याचा सावत्र भाऊ राजाराम यास ॥
गादीवर बसवावयास ॥ बेत केला होता लोकांनीं ॥ ३ ॥
तें समजतांच संभाजीला ॥ धरूनि त्या फितूरी लोकांला ॥
राजारामाच्याही आईला ॥ ठार त्यानें मारिलें ॥ ४ ॥
राजारामापासून विघ्न ॥ आपणास नव्हावें म्हणून ॥
त्याला रायगडीं बंदींत ठेवून ॥ आपण गादी घेतली ॥ ५ ॥

आर्या.

जे बापाचे होते प्रधान त्यांचा करूनि धिकार ॥
केला वजीर कलुशा दिधला त्यालाच सर्व अधिकार ॥ ६ ॥
नाईक वर्तनानें त्याच्या राज्यांत अव्यवस्था जी ॥
झाली ती न पहातां वर्ते निर्भयपणेंचि संभाजी ॥ ७ ॥
बेबंद फौज झाली अपल्या मुलखांत लूट चालविली ॥
न फिटे वेतन यास्तव त्यानें बहुतेक फौज घालविली ॥ ८ ॥

श्लोक.

वसूल पहिला तसा न उपजे प्रजे पासुनी ॥
तयास जन जाहले कितिक सोडिते वासुनी ॥
अनीति बहु जाहली ह्मणुनियां प्रजा कावली ॥
लुटारुस लुटावया बरिच संधिही फावली ॥ ९ ॥

दिंडी.

अशी होता राज्यांत अव्यवस्था ॥
तया नुमजे होईल कशि अवस्था ॥
सदा जाउनि संगमेश्वरीं राहे ॥
ऐष आरामी करुनि सुखालाहे ॥ १० ॥

ओंव्या.

मोंगलोचा तकरीबखान ॥ तेथें आला बातमी ठेवुन ॥

सेना समाजास ॥ आला होता दिल्लीहुनी ॥ १२ ॥
संभाजी धरला हें वर्तमान ॥ बादशाहास कळलें खानाकडून ॥
तत्क्षणीं आज्ञा धरून ॥ त्यास आणविलें तुळापुरीं ॥ १३ ॥
झाला संभाजी बंदीवान ॥ हें पाहून कोणी सज्जन ॥
बादशाहास विनंती करून ॥ म्हणती संभाजी रक्षावा ॥ १४ ॥

साक्या.

यवनपतीनें संभाजीला सांगुनियां पाठविलें ॥
तव रक्षण मारण हीं माझ्या हातीं हें जाणविलें ॥ १५ ॥
जरि तूं होशिल मुसलमान तरि वांचवीन मी तुजला ॥
नाहीं तरि आतांच तुला मी धाडिन यमसदनाला ॥ १६ ॥
ऐकुनि निरोप संभाजी हा संकटांत बहु पडला ॥
काय करावें व्याघ्रानें जो सांपळ्यांत सापडला ॥ १७ ॥
तेव्हां संभाजीनें योजुन औरंगजेब याला ॥
दिधलें उत्तर पहा कसें तें चित्तीं नाहीं त्याला ॥ १८ ॥
देशिल कन्या अपली मज तरि मुसलमान होईन ॥
नाहीं तरि आतांच सुखानें यमसदना जाईन ॥ १९ ॥

आर्या.

ऐसें भाषण परिसुनि आला अति कोप बादशाहाला ॥
मारा आतांचि म्हणे संभाजीला करुनि बहु हाला ॥ २० ॥

दिंडी.

अशी आज्ञा होतांच सेवकाला ॥

तिहीं संभाजी ओढुनियां नेला ॥
हाल करुनी बहु दुःख दिलें त्याला ॥
प्रथम मग त्याचा शिरश्छेद केला ॥ २१ ॥

## साकी.

त्याचा वजीर कलुशा त्याची गतिही तशीच केली ॥
सन सोळासें एकुणनव्वद सालिं गोष्ट ही झाली ॥ २२ ॥

## ओंव्या.

अवरंगजेब यवन राजा ॥ दक्षिणदेश जिंकावयाचे काजा ॥
आला होता त्याच्या फौजा ॥ चौंहीकडे पसरल्या ॥ २३ ॥
त्यांशीं संभाजीनें युद्ध केलें ॥ बहुतवेळां शत्रूंस जिंकलें ॥
स्वपराक्रमें यश मिळविलें ॥ त्रासविलें यवनांसी ॥ २४ ॥
राज्यकारभारीं चित्त नसे ॥ तें ऐषआरामींत फार असे ॥
तो विशाळगडीं कीं पन्हाळीं वसे ॥ किंवा राहे संगमेश्वरीं ॥ २५
संभाजीच्या आंगीं गुण ॥ परि ते व्यर्थ दुर्व्यसनें करून ॥
नऊ वर्षें राज्य चालवून ॥ मरण पावला शत्रुहस्तें ॥ २६ ॥

## श्लोक.

संभाजीला पुत्र होता शिवाजी ॥
दिल्लीशाच्या बद्ध तो बंदिमाजी ॥
शाहू ऐसें नाम झालें तयाला ॥
झाला त्याच्या पात्रही तो कृपेला ॥ २७ ॥

## राज्याधिकारी राजाराम आणि ताराबाई यांचें वर्णन.

( इसवी सन १६८९ पासून सन १७०८ पर्यंत. )

### ओंव्या.

संभाजी पावला मरण ॥ तेव्हां त्याचा पुत्र शिवाजी जाण ॥
होता सा वर्षांचा लहान ॥ रायगड किल्यावरी ॥ १ ॥
पूर्वी संभाजीनें आपला ॥ सावत्रभाऊ राजाराम याला ॥
कैद करून तो ठेविला ॥ होता रायगडींच ॥ २ ॥
संभाजी मरण पावल्यावरी ॥ मिळोनि सर्व कारभारी ॥
म्हणती शिवाजी थोर होय तोंवरी ॥ धनी करावा राजाराम ॥ ३ ॥
राजाराम मुक्त करून ॥ जिंजीस गेले घेऊन ॥
त्यास राज्याधिकारी करून ॥ पुढें काम चालविलें ॥ ४ ॥

### साक्या.

इकडे मूल शिवाजी त्याची आई येसूबाई ॥
रायगडावर होती बंदोबस्त असे त्या ठाईं ॥ ५ ॥
अवरंगजेबाच्या लोकांनीं तो किल्ला सर केला ॥
तेव्हां मातेसह तो मुलगा त्यांच्या हातीं गेला ॥ ६ ॥
त्यांनीं त्या दोघांला औरंगजेबा कडेस नेलें ॥
त्यानें दोघांचेंही प्रेमें पालन पोषण केलें ॥ ७ ॥

### आर्या.

मग अवरंगजेबाचें प्रेम बहुत त्या शिवाजीवर जडलें ॥

म्हणतां साब विनोदें शाहू ऐसेंच नांव त्या पडलें ॥ ८ ॥
त्या राजारामाचे जिंजेंत होते प्रधान जे त्यांत ॥
प्रल्हाद निराजी हा फार चतुर राज्यकारभारांत ॥ ९ ॥
त्याच्याच विचारानें राज्याचें सर्व काम चालविलें ॥
जें जें संकट आलें तें तें त्यानेंच सर्व घालविलें ॥ १० ॥
संभाजीच्या वेळीं बहुत बखेडा असेच जो झाला ॥
तो मोडुनियां पहिल्या परि बंदोबस्त चांगला केला ॥ ११ ॥
मग राजारामानें रायगडा वरुनि आपली गादी ॥
नेली साताऱ्याला देती अनुमोदन प्रधानादी ॥ १२ ॥

ओंवी.

तेव्हां पासून मराठ्यांनीं ॥ सातारा केली राजधानी ॥
तेथेंच पुढील राजांनीं ॥ राज्य केलें बसोनियां ॥ १३ ॥

आर्या.

प्रल्हाद निराजी हा आला सर्वांत फार कामाला ॥
यास्तव पंतप्रतिनिधि ऐशी पदवी नवी दिली त्याला ॥ १४ ॥
संताजी घोरपडे याणें सांभाळिलें बहुत कटका ॥
राजानें बहुमानें दिधलें त्याला निशाण जरिपटका ॥ १५ ॥

ओंव्या.

राजाराम गेला मरोन ॥ तेव्हां त्यास होत्या स्त्रिया दोन ॥
थोरलीचें ताराबाई अभिधान ॥ राजसबाई हें धाकटीचें ॥ १६ ॥
पुत्र शिवाजी ताराबाईचा ॥ तो होता तेव्हां दहा वर्षांचा ॥

संभाजी पुत्र राजसबाईचा ॥ तीन वर्षांचा त्या काळीं ॥ १७ ॥
कारभाऱ्याच्या विचारानें ॥ शिवाजी पुत्र ताराबाईनें ॥
गादीवर बसवून ज्युतीनें ॥ राज्यकारभार चालविला ॥ १८ ॥
तिनें केली मसलत ॥ राजसबाई पुत्रा साहित ॥
नेऊनि ठेविली बंदींत ॥ झाली निर्भय आपण ॥ १९ ॥
राजारामाची ज्येष्ठ राणी ॥ ताराबाई मोठी शहाणी ॥
मोंगलां पासूनि आपलीं ठाणीं ॥ लढाया करून घेवविलीं ॥ २० ॥

साक्या.

ऐसें असतां हिंदुस्तानीं ज्यानें सुविजय केला ॥
तो नरसिंह अहंमदनगरीं अवरंगजेब मेला ॥ २१ ॥
मरतां तो मोंगल लोकांचें परडे बसले खालीं ॥
घडलें इसवी सन तत्राशें साताच्या हें सालीं ॥ २२ ॥

---

## शाहुराजाचें वर्णन.

(इसवी सन १७०८ पासून १७४९ पर्यंत.)

श्लोक.

मेला जैं अवरंगजेब नृपती तैं त्यास पुत्र त्रय ॥
मो अज्जीम, अजीमशाह, तिसरा तो कामबक्षाव्हय ॥

---

१ मनुष्यांत श्रेष्ठ.

होती ज्येष्ठ कनिष्ठ यांस दुरची तैं कामगारी दिली ॥
बापाची पदवी म्हणूनि मधल्या पुत्रांचे आटोपिली ॥ १ ॥

ओंव्या.

संभाजीचा पुत्र शिवाजी ॥ होता दिल्लींत बंदी मांजी ॥
अजीमशाह जाहला राजी ॥ सोडावया तयास ॥ २ ॥
जर मी राज्यपद पावेन ॥ तर बादशाहाच्या आज्ञेत वागेन ॥
ऐसें देऊनि प्रमाण वचन ॥ मुक्त झाला शिवाजी ॥ ३ ॥
जरि तूं ऐसा वागशील ॥ तरि बापाचा मुलुख पावशील ॥
हे बादशाह बोलोनि बोल ॥ निरोप दिला तयाला ॥ ४ ॥

श्लोक.

राहूपासुनि भानु साच सुटला शाहू तदा त्याजला ॥
बाहूं ये जन भेट थापटुनियां बाहूंस आनंदला ॥
पाहूनि प्रतिमा नलाभ म्हणती दाहून आम्हां नवा ॥
राहूं बा पदरीं तुझ्या सकळही लाहूं सुखा वैभवा ॥ ५ ॥

अभंगचौचरणी.

दिल्लीहूनी तो निघाला ॥ दक्षिण देशासी चालला ॥
शाहू सुटोनियांआला ॥ ऐकुनि लोकां आनंद ॥ ६ ॥
नाम शिवाजी लोपलें ॥ शाहू नांव पुढें आलें ॥
कारण याचें सांगितलें ॥ आहे मागें पहावें ॥ ७ ॥

आर्या.

हा गादीचा वारस समजुनि सरदार त्याकडे आले ॥

ताराबाई पासुनि ग्यांया संस्थान सिद्ध ते झाले ॥ ८ ॥

शाहूनें त्यासमयीं ताराबाईस धाडिलें पत्र ॥

कीं माझें मज द्यावें सिंहासन आणि राजकी छत्र ॥ ९ ॥

गादी नदोचि त्याला युक्तीनें ती धरावया पाहे ॥

बोले न खराशाहू हा कोणी धूर्त तोतया आहे ॥ १० ॥

तें ऐकुनि कोपानें ताराबाई सवें लढायास ॥

सेना घेउनि गेला केला तेणें तदा महायास ॥ ११ ॥

ताराबाईनेंही केलें निज सैन्य सिद्ध युद्धाला ॥

होतां युद्ध परस्पर पराभव तीचाच शेवटीं झाला ॥ १२ ॥

जिंकुनि मुलुख किल्ले मग सातान्यास पातला शाहू ॥

स्वीकारोनि गादीतें राजा झालाच तो महाबाहू ॥ १३ ॥

राज्य प्राप्ती साठीं त्या बाईनें प्रयत्न बहु केला ॥

परिशाहु पुढें तीचा तो यत्न व्यर्थ सर्वही गेला ॥ १४ ॥

पावुनि पराभवातें तारा कोलापुरास ती गेली ॥

तेथील मुलुख कांहीं घेउनि गादी स्वतंत्र मग केली ॥ १५ ॥

जेव्हां शाहू गेला ताराबाई सवें लढायास ॥

तेव्हां कोणे एके स्त्रीनें निजपुत्र अर्पिला त्यास ॥ १६ ॥

तो घेउनि शाहूनें त्या फत्तेशिंग ठेविलें नांव ॥

प्रेमें पाळुनि अक्कलकोटाचा तोच बनविला राव ॥ १७ ॥

प्रल्हाद निराजीचा पुत्र गदाधर तया प्रतिनिधीची ॥

पदवी दिधली पिंगळे बहिरोपंतास पेशवाईची ॥ १८ ॥

सेनापती धनाजी जाधव होता तयाकडे पहिला ॥
मुलखाच्या वसुलाचा राजानें कारभार सांगितला ॥ १९ ॥
त्याच्या हाताखालीं होते बहु दक्ष दोन कारकुन ॥
आबाजी बाळाजी दोघेही करिति काम ते झटुन ॥ २० ॥
जाधव मेल्यानंतर बाळाजीपंत कारकून तरी ॥
शाहूच्या राज्याचा मुख्यत्वें सर्व कारभार करी ॥ २१ ॥
युद्धीं पराजयातें देउनि शत्रूंस फार लाजविलें ॥
बाळाजी पंतानें अपुलें सर्वत्र नांव गाजविलें ॥ २२ ॥
गुणप हून तयाचा शाहूनें त्यास पेशवाईची ॥
दिधली पदवी होती जी बहिरोपंतपिंगळा याची ॥ २३ ॥

श्लोक.

राज्यांत होती बहु अव्यवस्था ॥ केली सुधारूनि बरी व्यवस्था ॥
मुलूखही वाढविला तयानें ॥ केले रिपू वश्य पराजयानें ॥ २४ ॥

आर्या.

सरदेशमुखी आणिक चवथाई हक्क दोन जे त्यांची ॥
जाउनि दिल्लिस त्यानें मेळविली सनद बादशाहाची ॥ २५ ॥

साक्या.

बाळाजी विश्वनाथ जेव्हां मुख्य पेशवा झाला ॥
तेव्हां त्याचा पुरंदऱ्या आबाजि मुतालिक केला ॥ २६ ॥
रामचंद्र भानू या त्याची फडणविशी सांगितली ॥
तेव्हा पासून पेशव्याची बडतीच होत गेली ॥ २७ ॥

## ओव्या.

शाहुराजाच्या राज्य काळीं ॥ जी त्याची प्रधानमंडळी ॥
होती तिची नामावळी ॥ सांगतों मी क्रमानें ॥ २८ ॥
प्रतिनिधि परशुराम त्रिंबक ॥ पेशवा बाळाजी विश्वनाथ मुख्य ॥
अमात्य अंबारामबापू ऐक ॥ नारोशंकर सचिव तें ॥ २९ ॥
मंत्री नारोराम शेणवी जाती ॥ मानाशिंग मोरे सेनापती ॥
सुमंत आनंदराव सुमती ॥ न्यायाधीश होनाजी अनंत ॥ ३० ॥
मुद्गलभट्ट उपाध्याय ॥ तोच केला पंडितराय ॥
ऐसा प्रधानसमुदाय ॥ होता शाहू राजाचा ॥ ३१ ॥

## श्लोक.

यानांकरीं ठेविला राज्यभार ॥ दिला त्यांकडे सर्वही कारभार ॥
महालामधें स्वस्थ चित्तें निजावें॥सदा शाहुनेंकीं शिकारीस जावें ॥३२
चिंता पासुनि कष्ट त्या नरपती होता भिजाजी खरा ॥
वर्तावें स्वमनास येइल तसें हा मार्ग वाटे बरा ॥
होता शूर उदार सात्विक गुणी मानी द्विजां फारसा ॥
कोणाचें सहसा न चित्त दुखवी दाता दयाळू तसा ॥ ३३ ॥
दिल्लीपती हा यजमान माजा ॥ याचाच हा अंकित शाहु राजा ॥
असें म्हणे यास्तव दिल्लिपाळ ॥ मानी तयाला बहु सर्वकाळ ॥ ३४ ॥

## दिंडी.

पेशव्यांचें कर्तृत्व असे मोठें ॥ म्हणुनि शाहूला भीति नसे कोठें ॥३५॥
प्रजा त्याला अनुकूळ असे सारी ॥ मराठ्यांचें प्राबल्य होय भारी॥३६॥

**साकी.**

यापरि बेचाळिस वर्षें तो राज्य करुनियां गेला ॥

सन् सत्राशें एकुणवन्नासांत *नाकलोकाला ॥ ३७ ॥

**आर्या.**

होतें सासष्टावें वर्ष तयाच्या खरोखर वयाला ॥

परि नव्हता पुत्र तदा सांभाळायास राज्यपद याला ॥ ३८ ॥

**ओंव्या.**

शाहूनें आपल्या अंतकाळीं ॥ बोलावून प्रधानमंडळी ॥

राज्याधिकार पेशव्याच्या गळीं ॥ सर्वानुमतें घातला ॥ ३९ ॥

ताराबाईचा नातू रामराजा ॥ तो करावा दत्तपुत्र माजा ॥

माझ्या मागें तोच राजा ॥ करूनि राज्य चालवावें ॥ ४० ॥

राजाचा सन्मान राखावा ॥ बंदोबस्त हातीं ठेवावा ॥

सर्व राज्याचा अधिकार करावा ॥ तुम्हीं स्वतां आपण ॥ ४१ ॥

ऐसें सांगून शाहू गेला ॥ पेशव्यानें राज्याधिकार केला ॥

पुढें नांवाचा मात्र राजा झाला ॥ सर्व सत्ता पेशव्याची ॥ ४२ ॥

पहिला बाळाजी विश्वनाथ मेल्या॥मग बाजीराव बलाळ पेशवा झाला ॥

त्या मागें बाळाजी बाजीराव केला ॥ पेशवा शाहूराजानें ॥ ४३ ॥

---

* स्वर्गास.

## रामराजा, दुसरा शाहुराजा, व प्रतापसिंह आणि शहाजी राजा यांचें वर्णन.

( सन १७४९ पासून १८१८ पर्यंत. )

### आर्या.

मेला शाहू तेव्हां नाना साहेब पेशवा होता ॥
त्यानें अपुल्या हातीं राज्याची सर्व घेतली सत्ता ॥ १ ॥
होती शाहूची स्त्री प्रतिकूळ म्हणूनि युक्ति चालविली ॥
करवुनि बोध तिला पतिसंगेंच सती वळेंच घालविली ॥ २ ॥
करवीराहुनि राजाबेस्तव आणुन रामराजाला ॥
स्थापुनियां राज्यपदीं विधिनें अभिषेक करविला त्याला ॥ ३ ॥
राजास पेशव्यानें चित्र तसें बसविलें पदीं होतें ॥
कीं त्यास पेशवा जें सांगे जैसें करी तसें तो तें ॥ ४ ॥
देशाचें संरक्षण शत्रुपराभवहि सैन्य रक्षून ॥
करि पेशवाच युद्धहि सल्लाही निज हितास लक्षून ॥ ५ ॥
परतंत्रपणें अठ्ठाविस वर्षें राज्य भोगिलें तेणें ॥
केलें सन सत्राशें सत्तहतरांत मृत्यु घरिं *पेणें ॥ ६ ॥
नव्हता पुत्र तयाला म्हणवुनि त्याच्याच भाउबंदाचा ॥
मुलगा पाहुनि आणुनि दिधला त्याला किताब राजाचा ॥ ७ ॥

### ओंव्या.

तेव्हां सवाईमाधवरावाची ॥ कारकीर्द होती साची ॥

---

* गमन.

चलती नानाफडणविसाची ॥ त्यानेंच राजा हा केला ॥ ८ ॥
तोही परतंत्रपणें वर्तला ॥ एकवीस वर्षे राज्योपभोग केला ॥
सन सत्राशें आठ या साला ॥ माजि गेला परलोका ॥ ९ ॥
दुसरा बाजीराव पेशवा याची ॥ तेव्हां कारकीर्द होती साची ॥
चलती सदाशिव माणकेश्वराची ॥ मोठी होती त्या काळीं ॥ १० ॥

## साक्या.

तेव्हां प्रतापसिंहाभिधसुत होता त्या शाहूला ॥
सन अठराशें अठामधें तो गादीवर बैसविला ॥ ११ ॥
त्यानें तेथुनि कांहीं खटपट नकरावी या भावें ॥
किल्ल्यावर बंदींत ठेविला मग तो बाजीरावें ॥ १२ ॥
राज्य बुडे पेश्व्याचें तोंवरि होता तो बंदींत ॥
इंगळिशांच्या हातीं गेला अठराशें अठरांत ॥ १३ ॥
इंग्लिशांनीं तो थोड्या दिवशीं नेउनि सातान्याला ॥
देउनि कांहीं मुलुख त्याला तो राजा स्थापियला ॥ १४ ॥
बेविस वर्षे राज्य तयानें सातान्या मधिं केलें ॥
दुर्दैवानें परंतु त्याच्या हातुनि तेंही गेलें ॥ १५ ॥

## आर्या.

होता मुखत्यार खरा जरि ताबेदार इंग्लिशांचा तो ॥
परि पेंचामधिं आला विधि फिरतां निधिहि हातिंचा जातो ॥ १६ ॥
आला जेव्हां दोष प्रतापसिंहावरी फितूराचा ॥
तेव्हांच इंग्लिशांनीं हुकुम दिला त्यास काशिवासाचा ॥ १७ ॥

त्याचा कनिष्ठ बंधू ज्यास शाहाजी असें असे नाम ॥
केला साताऱ्याचा राजा तोही बघे स्वतां काम ॥ १८ ॥
सन अठरासें एकुण चाळिस पासूनियां तक्त झालें ॥
राज्योपभोग केला त्यानें परि आयु त्या उणें झालें ॥ १९ ॥

साकी.

नव्हता पुत्रतया बेवारस राज्य तयाचें झालें ॥
यास्तव इंग्लिश सरकारानें खालसाच तें केलें ॥ २० ॥

आर्या.

राजे शिवाजि पासुनि शहाजि पर्यंत जाहले अष्ट ॥
उत्कर्ष उणा होतां होतां तें राज्य जाहलें नष्ट ॥ २१ ॥
स्वामित्व सर्व हिंदुस्थानाचें इंग्लिशांकडे आलें ॥
त्यांत मराठ्यांचेंही अवघें सामिल राज्य तें झालें ॥ २२ ॥

---

## पेशव्यांचा इतिहास.

## बाळाजी विश्वनाथपेशवा.

( इसवी सन १७१४ पासून सन १७२० पर्यंत. )

ओंव्या.

शाहुराजाचा सेनापती ॥ धनाजी जाधव प्रख्यात कीर्ती ॥
वसुलाचें काम त्याच्या हातीं ॥ दिलें होतें राजानें ॥ १ ॥

धनाजीनें हुशार पाहोन ॥ ठेविले होते कारकून दोन ॥
वसुलाचें काम त्यांचे हातोन ॥ घेत असे तो सर्वदा ॥ २ ॥
एक बाळाजी विश्वनाथ ॥ श्रीवर्धनच्या कुळकरण्याचा सुत ॥
दुसरा आबाजी पुरंदऱ्या ख्यात ॥ सासवडचा कुळकरणी ॥ ३ ॥
पुढें धनाजी जाधवास ॥ समाधान नव्हतें बहुत दिवस ॥
येतां कोलापुराहून साताऱ्यास ॥ तो मार्गी मरण पावला ॥ ४ ॥
बाळाजी विश्वनाथ श्रीवर्धनकर ॥ होता जाधवाचे बरोबर ॥
त्याचा सर्व अधिकार ॥ आपण चालवूं लागला ॥ ५ ॥
धनाजीचा पुत्र चंद्रसेन ॥ आणि कित्येक पदरचे ब्राम्हण ॥
बाळाजी सवें आंतून ॥ द्वेष करूं लागले ॥ ६ ॥
चंद्रसेनजाधव सेनापती ॥ सैन्य देऊन त्या सांगाती ॥
मोंगलांच्या मुलखाप्रती ॥ वसुलास राजानें पाठविला ॥ ७ ॥
त्याच्या बापाचा कारकून ॥ बाळाजी विश्वनाथ समजून ॥
देखरेखी कारणें म्हणून ॥ बरोबर दिधला राजानें ॥ ८ ॥

आर्या.

त्या दोघांचें पडलें होतें जें वैमनस्य गुप्तपणें ॥
त्या कामाच्या योगें तें वाढत चाललेंच उघडपणें ॥ ९ ॥

ओंव्या.

तेव्हां कोणे एके दिवशीं ॥ बाळाजीपंताच्या स्वारांशीं ॥
जाधवाच्या स्वारांनीं कुराषतीसी ॥ काढूनि कलह माजविला ॥ १० ॥
तेव्हां बाळाजी आपला ॥ जीव रक्षावयाकारितां पळाला ॥

तो म्हासवड मुकामीं आला ॥ आश्रयमागावया सचिवास ॥ ११ ॥
जाधवाच्या भयें करून ॥ तेथें आश्रय न पावोन ॥
दोन पुत्र सवें घेऊन ॥ पांडवगडाकडे चालिला ॥ १२ ॥
मागें लागले जाधवाचे स्वार ॥ पाहून बाळाजी घाबरला फार ॥
म्हणे करावा काय विचार ॥ गुप्त कोठें तरी रहावें ॥ १३ ॥
त्याच्या सोबत्यांनीं धैर्य केलें ॥ त्यास पांडवगडीं पोहोंचविलें ॥
किल्लेदारानें वर घेतलें ॥ शाहुराजाच्या आज्ञेस्तव ॥ १४ ॥
तेथें जाधव आला धांवून ॥ बाळाजीपंत करा माझे स्वाधीन ॥
नाहीं तर मी शाहूचा पक्ष सोडीन ॥ ऐसें सांगून पाठविलें ॥१५॥
तेव्हां शाहूनें सरलष्कर ॥ हैबतराव निंबाळकर ॥
पाठविला जाधवावर ॥ जाधवास फिरवावया ॥ १६ ॥
दोघांच्या सैन्यांची गांठी ॥ पडतां युद्ध झालें उठाउठीं ॥
जाधव त्यास देऊन पाठीं ॥ निघोनि गेला कोलापुरा ॥ १७ ॥
दक्षिणेचा अधिकारी ॥ निजामउल्मुल्क याची स्वारी ॥
हैबतराव निंबाळकरावरी ॥ आली पारपत्या कारणें ॥ १८ ॥
शाहूनें निंबाळकराच्या मदतीस ॥ बाळाजी विश्वनाथ यास ॥
सैन्य देऊन पाठविलें नांवास ॥ सेनाकृत पद जोडोनी ॥ १९ ॥
सरलष्कर आणि सेनाकृत ॥ हे उभयतां सैन्यासहित ॥
पुरंदरा जवळ वाट पाहत ॥ होते मोगलांच्या फौजेची ॥ २० ॥
तेथें घोर युद्ध झालें ॥ मोगलांचें सैन्य कचरलें ॥
मग तहाचें बोलणें केलें ॥ मोगलांनीं ते वेळीं ॥ २१ ॥

शाहुराजाच्या राज्यांत ॥ अव्यवस्था झाली बहुत ॥
याचा पायपोस त्याच्या पायांत ॥ अशी अवस्था जाहली ॥ २२ ॥
कोणी सरदार शाहूकडे ॥ कोणी गेले संभाजीकडे ॥
कोणी राहिले मोगलाकडे ॥ कोणी स्वातंत्र्यें वागती ॥ २३ ॥
तेव्हां बाळाजी. विश्वनाथ शाहूला ॥ मसलत करून बोलला ॥
या वेळीं पराक्रम पाहिजे केला ॥ नाहींतर राज्य बुडेल॥ २४ ॥
मग शाहूच्या आज्ञेवरून ॥ बाळाजी विश्वनाथ फौज घेऊन ॥
निघाला सत्वर गति धरून ॥ बंदोबस्त करावया ॥ २५ ॥
दमाजी थोरात वश केला ॥ उदोजी चव्हाण जेरीस आणिला ॥
कान्होजी आंग्र्याशीं तह केला॥।जिंकिला कृष्णराव खटावकर ॥२६
असे बहुत प्रयत्न चालविले॥ आपसांतील तंटे मिटविले ॥
सर्वांचें एक मत केलें ॥ लक्ष्य लाविलें शाहूकडे ॥ २७ ॥
बाळाजी फार चतुर होता ॥ त्यानें राज्याची केली व्यवस्था ॥
वाढविली मराठ्यांची सत्ता ॥ आपल्या चातुर्य बळानें ॥ २८ ॥
ऐशीं उत्कृष्ट कामें करून आला॥ बाळाजी विश्वनाथ साताऱ्याला ॥
शाहुराजास भेटला ॥ सन्मान केला राजानें ॥ २९ ॥
शाहुराजा संतोष पावला ॥ बाळाजी विश्वनाथ पेशवा केला॥
बहिरोपंत पिंगळा दूर झाला ॥ सन सत्राशें चवदांत ॥ ३० ॥
तेव्हां पासून पेशव्यांची भरभर वाढत चालली साची ॥
आणि सत्ता मराठ्यांची ॥ चोहोंकडे वाढली ॥ ३१ ॥
होते दिलीच्या दरबारीं ॥ दोन सैयदबंधू अधिकारी ॥

त्यांवांचून राज्यकारभारीं ॥ कोणांचेंही चालेना ॥ ३२ ॥
त्यांशीं करून स्नेह अत्यंत ॥ बाळाजी विश्वनाथ सैन्यासहित ॥
करावया त्यांची मदत ॥ गेला दिल्लीस निघोनी ॥ ३३ ॥
तेथील बादशाहा पासून ॥ आपले हक्क व स्वराज्य मिळून ।
घेतल्या सनदा करून ॥ शाहुराजाच्या नांवानें ॥ ३४ ॥
बाळाजी विश्वनाथ सैन्यासहित ॥ कांहीं काळ राहून दिल्लींत ॥
आज्ञा घेऊन सन सत्राशें विसांत ॥ परत आला दक्षिणे ॥ ३५ ॥
भेटोनि शाहुराजास ॥ तसाच गेला सासवडास ॥
असमाधान होऊनि शरीरास ॥ तेथेंच मृत्यु पावला ॥ ३६ ॥
बाळाजी विश्वनाथ पेशवा मूळ ॥ तेव्हां पासून पेशव्यांचें कूळ ॥
प्रसिद्ध होऊन मराठ्यांचें बळ ॥ वाढलें हिंदुस्थानांत ॥ ३७ ॥

साकी.

त्यानें पेश्वाईचें ऐसें उत्कृष्ट काम केलें ॥
तेव्हां पासून मराठ्यांचें वर्चस्व होत गेलें ॥ ३८ ॥
त्यास पेशवा होउनि सातें वर्ष नसे जों सरलें ॥
तोंच तयाच्या आयुष्याचें माप कसेंहो भरलें ॥ ३९ ॥

आर्या.

बाळाजीला होते सुत दोन तयात थोर तो बाजी ॥
राव प्रसिद्ध पहिला म्हणती त्या धाकट्यास चिमणाजी ॥ ४० ॥

# पहिला बाजीराव पेशवा

# याचें वर्णन.

(सन १७२० पासून सन १७४० पर्यंत.)

## साकी.

जेव्हां तो बाळाजी विश्वनाथ पेशवा मेला ॥

त्याचा सुत शाहूनें बाजी राव पेशवा केला ॥ १ ॥

## आर्या.

तो शूर उदार चतुर मसलत करण्यांत शाहणा फार ॥

कामांत लढाईच्या हलथाच्याही तसा बहु हुशार ॥ २ ॥

वाटावें अन्याच्या ज्याचें भाषण मनास बहु गोड ॥

होता सुरूप तैसा जाणों लावण्य वल्लिचा मोड ॥ ३ ॥

जें मोठ्या लाभाचें दुःसाध्याहि जें अशाच कृत्याला ॥

साधायास झटावें धैर्यानें हेंच आवडे त्याला ॥ ४ ॥

त्याच्या मनांत वागे कीं आपण सैन्य फार मिळवावें ॥

हिंदुस्थानीं जाऊनि युद्ध करुनि मोगलांस जिंकावें ॥ ५ ॥

## ओंव्या.

निघोनियां सैन्यानिशीं ॥ युद्ध करुनि मोगलांशीं ॥

माळव्यांत आणि खानदेशीं ॥ अंमल आपला बसविला ॥ ६ ॥

होळगांवाचा चौगुला ॥ मल्हारजी हा होळकर झाला ॥

राणोजी सिंदा नामाथिला ॥ कण्हेरगांवचा पाटील ॥ ७ ॥

माळव्यांतील गांव धार ॥ तेथील उदाजी पोवार ॥

हे त्रिघे शूर सरदार ॥ बाजिरावानें वाढविले ॥ ८ ॥
नागपूरचा राघूजी भोंसला ॥ राजकृपेनें उदयास आला ॥
वराडचा सुभेदार झाला ॥ बाजिरावाचे अंमलांत ॥ ९ ॥

आर्या.

तो शाहूस ह्मणे कीं मोंगल जिंकावयास हा समय ॥
योग्य असे द्या आज्ञा मिळवुनि आणीन आपणास जय ॥ १० ॥
हें किति कराल आज्ञा तरि सर्वांलाहि हात दावीन ॥
कृष्णे पासुनि अटकेवरि झेंडा तुमचाच लावीन ॥ ११ ॥
ऐकुनि भाषण ऐसें फारच संतोष शाहु रायाला ॥
वाटुनि दिधली आज्ञा जाया स्वारीस बाजिरायाला ॥ १२ ॥
घेउनि सैन्य निघाला संपादायास विजय तो बाजी ॥
बाजी येऊं नदिली केले बहुतेक आपणा राजी ॥ १३ ॥
प्रीति शिपायांवर बहु करि बोले त्यांसवें सदा गोड ॥
झाले विरुद्ध त्यांची त्यानें तत्काळ मोडिली खोड ॥ १४ ॥
युद्धीं पराभवुनि वश केला जेणें निजाम उल्मुलुक ॥
श्रम करितां युद्धाचे जो बहु न ह्मणे तहान कीं न भुक ॥ १५
दाभाडे सेनापति शूर महा सैन्य ज्या जवळ मोठें ॥
द्वेष करी बाजीचा नित्य ह्मणे सांपडेल हा कोठें ॥ १६ ॥
बाजीराव ह्मणे त्या मत्ताचें पारिपत्य मी करिन ॥
युद्धांत ठार मारिन किंवा पाडाव करुनि त्या धरिन ॥ १७ ॥
सेनापतिवर जाया मेळविले थोर थोर सरदार ॥

हल्ला करुनी तयावर केला सेनापती रणीं ठार ॥ १८ ॥
हातीं शहर बडोदें नांवाची राजाधानि जी आली ॥
सला करून गाइकवाडाची स्थापना तिथे केली ॥ १९ ॥

ओंव्या.

कार्कींग आणि करनाटक प्रांत ॥ जिंकून गेला खानदेशांत ॥
माळवा आणि गुजरात ॥ जिंकुन पुढें चालला ॥ २० ॥
दिल्ली शहराजवळ पातला ॥ बादशाहासीं संग्राम झाला ॥
मग त्यानें सला केला ॥ परतविला सन्मानें ॥ २१ ॥
ऐसा सर्व हिंदुस्थानभर ॥ हिंडला घेऊन लष्कर ॥
मिळवून बहुत करभार ॥ स्वदेशास परतला ॥ २२ ॥
युद्ध करून मोंगलांशीं ॥ जर्जर केलें फार तयांसी ॥
हार मानूनि बाजीरावासी ॥ जहागिरी त्यांनीं दीधल्या ॥ २३ ॥
ऐसा बाजीराव महा प्रतापी ॥ सर्वत्र आपली सत्तास्थापी ॥
बहुतेक हिंदुस्थान जिंकिलें तयापी ॥ आशात्याची सरेना ॥ २४ ॥
सैन्य बहुत जमा करावें ॥ सावकारांपासून कर्ज घ्यावें ॥
खंडणी आणून तें फेडावें ॥ हाच क्रम त्याचा असे ॥ २५ ॥

आर्या.

रणशूर जसा बाजी त्याचा भाऊ तसाच चिमणाजी ॥
मदत कराया राजी चालाया उडिस तो नभीं गाजी ॥ २६ ॥
कापी शत्रूस रणीं जैसा बकऱ्यास कापितो कसई ॥
ज्यानें पोर्तुगिसांला जिंकुनि युद्धांत घेतली वसई ॥ २७ ॥

ज्यानें बहु शूरांचा युद्ध करुनि त्यांसर्व मद हारिवला ॥
सांगून पेशव्याला इंग्लिश लोकां सर्व तह करिवला ॥ २८ ॥
भावाचा शूरपणा पाहुनि संतोष बाजिरायास ॥
ज्यावर आपण आवें त्यावर 'युद्धास पाठवि तयास ॥ २९ ॥

### श्लोक पंचचामरवृत्त.

मनोदयानुरूप अर्थ सिद्ध नाहिं जाहला ॥
म्हणून फार खिन्न तो पुण्यास नाहिं पातला ॥
निरोप आइला दुतासवें लिहून धाडला ॥
तसाच लष्करासमेत उत्तरेस चालला ॥ ३० ॥

### आर्या.

त्याचा सुत बाळाजी नानासाहेब ह्मणति जन ज्यासी ॥
तो त्या समयीं होता युद्ध करित कोंकणांत आंग्र्यासीं ॥३१ ॥
मागुन तो चिमणाजी आपा साह्यार्थ त्याकडे गेला ॥
दोघांहिं रेवदंडा घ्यायाचा बेत तेधवां केला ॥ ३२ ॥

### साकी.

चुलते पुतणे मसलत करीत होते जों युद्धाची ॥
तों आली दुर्वार्ता बाजीरावाच्या मरणाची ॥ ३३ ॥

### श्लोक कामदाछंद.

नर्मदा तिरीं पावल्या वरी ॥ त्यास्थळींच तो राहणें करी ॥
कीं जिवास अस्वास्थ्य जाहलें ॥ यामुळें पुढें कूच राहिलें ॥ ३४ ॥

ओंव्या.

सन सत्राशें चाळीस ॥ असतां त्याचा चवथा *मास ॥
त्याची तारीख अठ्ठावीस ॥ उगवतां मरण पावला ॥ ३५ ॥
ऐकूनि हें अशुभ वृत्त ॥ करोनि लढाईचा बंदोबस्त ॥
आपा आणि नाना परत ॥ निघोनि आले साताऱ्या ॥ ३६ ॥
बाजिरावाचें मरण ॥ हें एक मोठें प्रकरण ॥
मोगलांच्या हर्षास कारण ॥ झालें दुःखास राज्याच्या ॥ ३७ ॥
वीस वर्षें राज्य चालविलें ॥ मराठ्यांचें हित फार केलें ॥
परि मन तृप्त नाहीं झालें ॥ मरण आलें शेवटीं ॥ ३८ ॥
त्यास होते पुत्र तीन ॥ बाळाजी, रघुनाथ, जनार्दन ॥
चवथा यवनी पासोन ॥ समशेरबहादूर या नांवें ॥ ३९ ॥
बाळाजी पुढें पेशवा झाला ॥ रघुनाथराव इंग्लिशांस मिळाला ॥
जनार्दन बावा अल्पायू वारला ॥ चवथा गेला वांद्यास ॥ ४० ॥

---

## बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे.
## यांचें वर्णन.

( इसवी सन १७४० पासून सन १७६१ पावेतों. )

आर्या.

सुत बाजीरावाचा नाना साहेब म्हणति जन त्याला ॥

---

* एप्रिल.

तो बाळाजी बाजी आवडला फार शाहुराजाला ॥ १ ॥
तो पेशवा करावा ऐसें शाहू स्वमनसांत धरी ॥
परि भोंसला रघूजी फितवुनि राजास थोर विघ्न करी ॥ २ ॥
तो सांगे राजाला बाबूजी नायकास अधिकार ॥
जरि द्याल पेशव्याचा देइल तो आपणास धन फार ॥ ३ ॥
परि त्या समयीं प्रतिनिधि अनुकूळ नहोय त्या विचाराला ॥
पुतण्याचा हितकर्ता चिमणाजीही न दे रुकाराला ॥ ४ ॥
यत्न रघूजीचा बहु परि तो नाहींच शेवटा गेला ॥
मग शाहू राजानें बाळाजीपंत पेशवा केला ॥ ५ ॥

ओंव्या.

सन सुत्राशें चाळीस ॥ त्याचा जोका आठवा *मास ॥
त्यांत बाळाजी बाजीरावास ॥ वस्त्रें झालीं पेशवाईचीं ॥ ६ ॥
बाबूजी नाईक बारामतीकर ॥ खिन्न झाला मनांत फार ॥
कर्जाविषयीं तगाददार ॥ पेशव्याकडे पाठवी ॥ ७ ॥
पेशवा पडला संकटांत ॥ त्याचा मुतालिक महादाजीपंत ॥
त्यानें संकटापासून मुक्त ॥ पेशवा केला ते वेळीं ॥ ८ ॥
नागपूरचा रघूजी भोंसला ॥ पेशव्याशीं द्वेष करूं लागला ॥
फौज घेऊनियां निघाला ॥ जिंकावया पेशव्यास ॥ ९ ॥
नानासाहेब सिद्ध झाला ॥ ह्मणे जिंकीन भोंसल्याला ॥
दोघांचा कलह वाढला ॥ युद्धें झालीं बहुवार ॥ १० ॥

---

* आगस्ट.

मग शाहुराजा मध्यें पडून ॥ दोघांची समजूत घालून ॥
त्यांचा कांहीं ठराव करून ॥ कलह मोडून टाकिला ॥ ११ ॥
सन सत्राशें एकुणवन्नास ॥ सालीं शाहू पावला मरणास ॥
त्याकाळीं बाळाजी बाजीरावास ॥ दिला अधिकार राज्याचा ॥ १२ ॥
मुलखाच्या बंदोबस्तास ॥ कांहीं दिवस साताऱ्यास ॥
कांहीं दिवस पुण्यास ॥ राहत असे पेशवा ॥ १३ ॥
मग साताऱ्याहून काढिली ॥ पुणें शहरांत आणिली ॥
गादी कारभाराची केली ॥ राजधानी मराठ्यांची ॥ १४ ॥
माळवा करनाटक गुजरात ॥ दिल्ली अलाहाबाद बंगालप्रांत ॥
यांत स्वाऱ्या करून सतत ॥ खंडण्या बहुत मिळविल्या ॥ १५ ॥
धाडोनि गुप्तरूपें चार ॥ आणावा जागजागींचा समाचार ॥
हें व्यसन होतें फार ॥ नानासाहेब पेशव्यास ॥ १६ ॥
तो राजकीय कामांत फार ॥ होता सर्वांहून चतुर ॥
तसाच होता महाशूर ॥ परंतु कपटी मनाचा ॥ १७ ॥
मिजाजी आणि विलासी ॥ होता कांहींसा आळशी ॥
एखाद्या कष्टाच्या कामाशी ॥ त्याचें मन कंटाळे ॥ १८ ॥

**आर्या.**

त्याचा कनिष्ठ भाऊ ज्याचें रघुनाथराव हें नाम ॥
त्याजकडेसाचि साऱ्या फौजेचें सोंपलें असे काम ॥ १९ ॥
रघुनाथराव होता शूर तयाचे पराक्रम न थोडे ॥
शत्रू जर्जर केले ज्यानें अटकेस पाजिले घोडे ॥ २० ॥

दिंडी.

चुलत बंधु जो सदाशिवराव ॥ भाउसाहब हें असे तया नांव ॥
त्यास राज्याचा कारभार सर्व ॥ दिला होता जाणून खराभाव ॥ २१ ॥

श्लोक.

दोघेही असती हुशार अपुल्या कामात ते सारखे ॥
निष्ठेनें प्रभुकार्य सर्व करिती होते न कीं पारखे ॥
होता आश्रय पेशव्यास दृढ हा त्या दोजणांचा खरा ॥
होते दोन धिरे ह्मणूनि बसला धक्का न त्याच्या घरा ॥ २२ ॥

ओंव्या.

शहाणा विश्वासु मान्य सर्वांस ॥ जो रामचंद्रबाबा शेणवी यास ॥
मराठी राज्याच्या बंदोबस्तास ॥ नेमिलें भाऊसाहेबानें ॥ २३ ॥
राज्यात अव्यवस्था जाहली ॥ होती ती सर्व मोडून टाकिली ॥
पुन्हा नीट व्यवस्था केली ॥ त्या दोघां शहाण्यांनीं ॥ २४ ॥
नानासाहेबाच्या कारकीर्दीत ॥ मराठेलोक हिंदुस्थानात ॥
गुजरातेंत आणि करनाटकांत ॥ स्वाऱ्या करीत राहिले ॥ २५ ॥
त्या वेळेस लोक मराठे ॥ झाले होते बळिष्ट मोठे ॥
शत्रु आहेत कोण कोठें ॥ हेंच पाहती सर्वदा ॥ २६ ॥
दिल्लीपतीचे कारभारी ॥ त्यांचा विश्वास मराठ्यांवरी ॥
एखादी गोष्ट वाईट बरी ॥ मराठ्यांच्या विचारें होतसे ॥ २७ ॥

साकी.

अहमदशा अबदाली नामें अफगाणाचा राजा ॥

काबूलाहुन पंजाबावर आला घेउन फौजा ॥ २८ ॥
युद्ध करुनि पंजाब आवघा त्यानें करगत केला ॥
ठेवुनि तेथें सुभेदार मग आपण देशीं गेला ॥ २९ ॥

श्लोक.

त्या वर्षींच निजाम उल्मुलुक तो गेला मरोनी वरी ॥
होतीं शंभर आणि चार वरुषें त्याच्या वयाला खरीं ॥
होते पुत्र तयास *साजण तरी त्या सर्व पुत्रांतला ॥
चौथा ज्यास निजामअलि[१] म्हणती राज्यास तो पावला ॥ ३० ॥

अभंग

सहाजणामध्यें बाढला जो कलि ॥
ती संधी साधली मराठ्यांस ॥ ३१ ॥
पेशव्यानें त्यांच्या मुलखांत जाऊनी ॥
लढाया करोनी स्वहित केलें ॥ ३२ ॥
श्रीरंग पट्टणावर स्वारी केली ॥
खंडणी घेतली त्यां पासून ॥ ३३ ॥
दक्षिणेकडील आवघीं संस्थानें ॥
बाळाजी बाजीनें वश केलीं ॥ ३४ ॥

साकी.

अफगाणचा सुभेदार जो होता पंजाबांत ॥
त्याला तेथुनि काढुनियाया पाठविला रघुनाथ ॥ ३५ ॥

---

* सहाजण. १ हैदराबाद

घेउनी फौजा पंजाबावर रघुनाथराव गेला ॥
अफगाणांच्या सरदाराशीं युद्ध प्रसंग केला ॥ ३६ ॥
करुनि पराभव त्याचा तेथुनि तो हांकुनि घालविला ॥
पंजाबावरें मराठे यांचा मग अंमल बैसविला ॥ ३७ ॥
या स्वारीला फौजेकरितां खर्च ममर्सी झाला ॥
अर्थ नसों पण कर्ज घेउनी *तो माघारा आला ॥ ३८ ॥
ह्मणे सदाशिवराव तेधवां राघोबा दादाला ॥
केला रिता खजीना कैसें फेडावें कर्जाला ॥ ३९ ॥
स्वारिस जाउन धन जोडावें किंवा कर्ज करावें ॥
हें ज्या नकळे त्या पुरुषानें स्वारिस कशास जावें ॥ ४० ॥
राघोबा क्रोधानें बोले मूर्ख अह्मी समजावे ॥
आपण चतुर अहां तरि दुसऱ्या स्वारिस आपण जावें ॥ ४१ ॥
ऐसें दोघांमध्यें जेव्हां वैमनस्य जें आलें ॥
तें मोडाया मध्यें पडणें पेशव्यास तें झालें ॥ ४२ ॥
मग ठरलें कीं राघोबानें मुलकी काम पहावें ॥
फौजा घेऊन भाऊसाहेब यानें स्वारिस जावें ॥ ४३ ॥

गीत.

फौजा घेउनी नीघाला ॥ निजाम अली वरती गेला ॥
त्याचा पराभव ही केला ॥ भाऊसाहेबानें ॥ ४४ ॥

---

* रघुनाथराव.

निजामअलीनें तह केला ॥ पेशव्याला मुलूक दिधला ॥
ऐसा बहु जय संपादिला ॥ भाऊसाहेबानें ॥ ४५ ॥

आर्या

जय संपादुनि आला भाऊसाहेब पेशव्या पाशीं ॥
होते बोलत गोष्टी आनंदाच्याच एकमेकाशीं । ४६ ॥
तों दुर्वार्ता कळली हिंदुस्थानीं अमेदशा आला ॥
पंजाब देश जिंकुनि तेणें दिल्लींत घातला घाला ॥ ४७ ॥

ओंव्या

ऐकून पेशवा झाला खिन्न ॥ भाऊ बोलला गर्व करून ॥
आज्ञा द्याल तरी जाऊन ॥ जिंकीन अफगाण लोकांतें ॥ ४८ ॥
मला आणि विश्वासरावास ॥ नेमावें या कामगारीस ॥
जाऊनि सत्वर दिल्लीस ॥ यश आणितों माघारें ॥ ४९ ॥
गर्वें बोले सदाशिवराय ॥ आम्हां अनकूळ शिवाचे पाय ॥
आमेदशा म्हणजे पदार्थ काय ॥ उडवीन कसपटा प्रमाणें ॥ ५० ॥
ऐकून आनंद पेशव्यास ॥ आज्ञा दिधली जावयास ॥
संगें न्यावें विश्वासरावास ॥ सैन्य सिद्ध करावें ॥ ५१ ॥

साकी

त्या भाऊच्या वीरश्रीतें पाहुनि जनास वाटे ॥
कीं हा जाउनि जिंकुनि शत्रुस निश्चित लाविल वाटे ॥ ५२ ॥

ओंव्या.

झाली सैन्याची तयारी ॥ निघाले करावया स्वारी ॥

वाजल्या जयाच्या *भेरी ॥ आनंद झाला सर्वांतें ॥ ५३ ॥
वीस हजारघोडे स्वार ॥ कवाइती पायदळ वीस हजार ॥
तोफखाना मोठा बरोबर ॥ हें खासगत सैन्य पेशव्याचें ॥ ५४ ॥
नानासाहेबाच्या आज्ञेवरून ॥ आपापल्या फौजा घेऊन ॥
सर्व सरदार मिळाले येऊन ॥ भाऊसाहेबाच्या लष्करास ॥ ५५ ॥
मल्हारराव होळकर ॥ जनकोजी सिंदा महाशूर ॥
यशवंतराव पंवार ॥ आणि दमाजी गायकवाड ॥ ५६ ॥
आपाजीराव आठवले ॥ अंताजी माणकेश्वर बिनीवाले ॥
आणि गोविंदपंत बुंदेले ॥ आले फौजा घेऊनी ॥ ५७ ॥
शिवाय रजपूत राजांनीं ॥ पाठविल्या फौजा निवडोनी ॥
यांशिवाय पेंढाऱ्यांनीं ॥ बहुत टोळ्या आणिल्या ॥ ५८ ॥
ऐसें भाऊसाहेबा बरोबर ॥ खटलें जमलें अपार ॥
सैन्य दोन लक्ष सुमार ॥ बाजार बुणगे तितकेंच ॥ ५९ ॥
विठ्ठलशिवदेव विंचूरकर ॥ त्रिंबक सदाशिव पुरंदर ॥
नारोशंकर व समशेर बहादुर ॥ बळवंतराव गणपत मेहेंदळे ॥ ६० ॥
छोटेखानी सरदार अनेक ॥ मोठमोठे मानकरी लोक ॥
चित्तीं धरूनि संग्राम कौतुक ॥ भाऊसाहेबा संगें चालले ॥ ६१ ॥
होळकराचा परमदोस्त ॥ सुरजमलजाट अवचित ॥
तीसहजार सैन्य सहित ॥ वाटेंत येऊन मिळाला ॥ ६२ ॥
असें अपार सैन्य घेऊन ॥ भाऊसाहेब दिल्लीस जाऊन ॥

* नगारे.

दिल्ली हस्तगत करून ॥ स्थापिते झाले बादशाहातें ॥ ६२ ॥
हें कळलें अमेद शाहाला ॥ तो मोठें सैन्य घेऊन आला ॥
उतरून यमुना नदीला ॥ दिल्लीजवळ ठेपला ॥ ६४ ॥
पहिले दिवशींच्या युद्धांत ॥ दोघेही ह्मणती आम्हीं जयवंत ॥
परि दोन्ही पक्षांत ॥ समानता राहिली ॥ ६५ ॥
मराठ्यांनीं विचार केला ॥ सैन्या भोंवती खंदक खणला ॥
शत्रूचा न व्हावया घाला ॥ इब्राइमखानाच्या मसलतीनें ॥ ६६ ॥
तिकडे आमेदशा अबदाली ॥ तोडवी झाडें मोठमोठालीं ॥
टाकवी सैन्या भोंवतालीं ॥ कराया अडचण शत्रूनें ॥ ६७ ॥
उभय सैन्यांतील *सैनिक ॥ बाहेर निघती सकौतुक ॥
गांठूनियां एकमेक ॥ एकमेकाशीं झगडती ॥ ६८ ॥
ऐसा लोटला एक मास ॥ तोटा पडला अन्न सामग्रीस ॥
पडूं लागले उपास ॥ मराठ्यांच्या फौजेला ॥ ६९ ॥
ऐसा प्रसंग गुदरला ॥ धान्य नमिळे कोणाला ॥
युद्धावांचून नाहीं उरला ॥ उपाय दुसरा तयांस ॥ ७० ॥
ह्मणती उपाशीं मरावें ॥ याहून रणीं मरण बरवें ॥
पाहिजे तसें करावें ॥ ऐशी आज्ञा मागती ॥ ७१ ॥
उद्यां निर्वाण युद्ध करूं ॥ शत्रूस मारूं किंवा मरूं ॥
पण आतां माघारे नच फिरूं ॥ हाच निश्चय सर्वांचा ॥ ७२ ॥
भाऊसाहेबांनीं मान्य केलें ॥ शिल्लकी धान्य वांटून टाकलें ॥

---

* शिपाई.

युद्ध करण्या विषयीं दिधलें ॥ आज्ञावचन सर्वांस ॥ ७३ ॥
सनसत्राशें एकसष्टांत ॥ जानेवारी तारीख सात ॥
त्यादिवशीं सोनपतपानपत ॥ येथील लढाई नेमिली ॥ ७४ ॥
सूर्योदयाचे अगोदर ॥ सिद्ध झालें सर्व लष्कर ॥
जावयास शत्रूवर ॥ छावणी सोडून निघालें ॥ ७५ ॥
पुढें चालला तोफखाना ॥ मागून चालती शस्त्रें नाना ॥
त्यांमागें पायदळ करी गमना ॥ चालती स्वार त्यां मागें ॥ ७६ ॥
मध्येंमध्यें शूर सरदार ॥ हातीं धरून भाला तलवार ॥
समले सोडून पाठीवर ॥ आणिती वीरश्री आंगांत ॥ ७७ ॥
अहमदशाहानें पाहिलें ॥ मराठ्यांचें सैन्य चालून आलें ॥
आपलें सैन्य सिद्ध केलें ॥ तोफा पुढें करूनी ॥ ७८ ॥
चालला तोफांचा भडिमार ॥ मागून बंदुकांचे बार ॥
आवेशानें जाती स्वार ॥ धांवोनि एक मेकांवरी ॥ ७९ ॥
हिंदू बोलती हरहर ॥ दीनदीन मुसलमान वीर ॥
शस्त्र घायें होऊनि ठार ॥ पडती अपार भूतळीं ॥ ८० ॥
धुळयानें व्यापिलें गगना ॥ कोणास कांहीं दिसेना ॥
शत्रु कीं मित्र ओळखेना ॥ जाहली गर्दी ते वेळीं ॥ ८१ ॥
अडीच प्रहरांचे सुमारास ॥ जखम लागली विश्वासरावास ॥
तो तत्काळ मुकला प्राणास ॥ त्या रणभूमीवरी ॥ ८२ ॥
कळतांच भाऊसाहेबाला ॥ तो हत्तीवरून खालीं उतरला ॥
म्हणे विश्वासराव गेला ॥ आतां म्यां काय रहावें ॥ ८३ ॥

ऐसें बोलोनि घोड्यावर ॥ झाला भाऊसाहेब स्वार ॥
शिरला गर्दीत सत्वर ॥ झाला तत्काळ दिसेनासा ॥ ८४ ॥
मराठ्यांचें धैर्य खचलें ॥ अवघें सैन्य पळत सुटलें ॥
अफगाणी सैन्य मागें लागलें ॥ ठार केले बहुतेक ॥ ८५ ॥
जे छावणी कडे गेले ॥ ते खंदकांत पडून मेले ॥
खंदक भरून चालले ॥ वरून पळतां कित्येक ॥ ८६ ॥
ऐशी दाणादाण जाहली ॥ ज्याला जिकडे वाट फुटली ॥
त्याणें ती धरिली ॥ जीवरक्षणा कारणें ॥ ८७ ॥
मराठ्यांच्या छावणीस ॥ बेत करिती लुटावयास ॥
परि वेढा घालून रात्रीस ॥ अफगाणी तेथेंच राहिले ॥ ८८ ॥
मग होतां प्रातःकाळ ॥ धरून नेलीं माणसें सकळ ॥
वांटून घेती स्त्रियाबाळ ॥ पुरुष दावणी बांधिले ॥ ८९ ॥

आर्या.

ऐसें त्या अफगाणी लोकांचें क्रूर कर्म पाहून ॥
सज्जन चित्तीं वदले कीं नाहीं निंद्य कर्म याहून ॥ ९० ॥

ओंव्या.

झाली दुर्दशा मराठ्यांची ॥ नाहीं राहिली पिसू त्यांची ॥
ही वार्ता अपकीर्तीची ॥ चोहींकडे पसरली ॥ ९१ ॥
हिंदुस्थानचें वर्तमान ॥ आलें दक्षिणेकडे धांवून ॥
पेशव्याच्या कानीं शिरून ॥ हृदयस्थळीं आदळलें ॥ ९२ ॥
प्रथम साच न वाटे तयास ॥ आपण निघाला यावयास ॥

जीव घेऊन आलेल्यांस ॥ पाहून संशय फेडिला ॥ ९३ ॥
तोच धक्का बसला उरीं ॥ असमाधान वाढलें शरीरीं ॥
पांचव्या महिन्यांत पर्वतीवरी ॥ देहावसान पावला ॥ ९४ ॥

आर्या.

आधींच अनर्थाच्या वार्तेनें हाय हाय जन करिती ॥
तों मरण पेशव्याचें होतां दुःखास आणिली भरती ॥ ९५ ॥

---

## माधवराव बल्लाळ पेशवा याचें वर्णन.

(इ०सन १७६१ पासून सन १७७२ पर्यंत.)

आर्या.

बाळाजी बाजी हा मेल्यावर वडिल पुत्र जो त्याचा ॥
माधवराव तयाला दिधला अधिकार पेशवाईचा ॥ १ ॥

ओंव्या.

माधवराव पेशव्याचें ॥ वय होतें सत्रावर्षांचें ॥
ह्मणून काम दिवाणगिरीचें ॥ रघुनाथराव काका करी ॥ २ ॥
रघुनाथरावाची सत्ता झाली ॥ जुनी मंडळी दूर सारिली ॥
नवी मंडळी जमा केली ॥ रघुनाथ रायानें ॥ ३ ॥
सखारामबापू एक ॥ दुसरा निळकंठराव पुरंधऱ्या देख ॥
हे त्यानें आपले मुख्य ॥ कारभारी केले ॥ ४ ॥

मोरोबा भानूची फडनविशी ॥ दिधली चिंतोविठ्ठलासी ॥
परी हें कृत्य पेशव्यासी ॥ आवडलें नाहीं ॥ ५ ॥
याच कारणा वरून ॥ त्रिंबकरावमामा आदिकरून ॥
थोर थोरांच्या मनांतून ॥ रघुनाथराव उतरला ॥ ६ ॥
रघुनाथ रावाचें वर्तन ॥ पेशव्यास न आवडे मनांतून ॥
तरी तो वाहेरून ॥ मान राखी काकाचा ॥ ७ ॥

आर्या.

काकाचें गाऱ्हाणें *मामाला गुप्त पेशवा सांगे ॥
कीं राज्याचा वांटा घ्यावा हें त्याचिया मनीं वागे ॥ ८ ॥

ओव्या.

त्रिंबकराव मामा शूर ॥ होता त्याकडे सैन्याचा अधिकार ॥
तरी राज्याचा कारभार ॥ तो आपण करूं इच्छी ॥ ९ ॥
मामाकडे पेशव्याचें मन ॥ हें जाणून †दोघेजण ॥
बसले कारभार टाकून ॥ अडवावया पेशव्यातें ॥ १० ॥
पेशवा यांचें आर्जव नकरी ॥ मामास बोलाविलें सत्वरी ॥
दिधली त्यास दिवाणगिरी ॥ काम पुढें चालविलें ॥ ११ ॥
रघुनाथराव पस्तावला ॥ पुणें सोडून निघाला ॥
नासिकास जाऊन राहिला ॥ मग आश्रय करी मोगलांचा ॥ १२ ॥

आर्या.

चित्तांत पेशव्याचा मामाचाही धरूनियां दावा ॥

---

*त्रिंबकरावमामा. †सखारामबापू व रांगेबादादा.

रघुनाथानें सैना मिळवुनि मग मांडिलाच कंहावा ॥ १३ ॥

ओंव्या.

पेशव्यानें निजामाबरी ॥ सैन्य घेऊनि केली स्वारी ॥
हैदर अली आणिला जेरी ॥ युद्ध करुनि त्यासवें ॥ १४ ॥
जानोजी भोंसला जिंकिला ॥ काका धरुन पुण्यास आणिला ॥
ऐसा पराक्रम बहुत केला ॥ माधवराव पेशव्यानें ॥ १५ ॥
सखारामबापू कारभारी ॥ तो बसविला आपल्या घरीं ॥
नानाफडणविसाप्र पुढें करी ॥ ब्राह्मणा चतुर जाणोनी ॥ १६ ॥
उत्तम न्याय करावयास ॥ रामशास्त्री केला न्यायाधीश ॥
सख व्हावया लोकांस ॥ बहुत उपाय योजिले ॥ १७ ॥
पेशव्यांच्या कुळांत ॥ माधवराव झाला नीतिमंत ॥
प्रजांस सुख दिधलें बहुत ॥ लोक वाखाणिती तयाला ॥ १८ ॥

आर्या.

या माधवरावानें अकरा वर्षे करुनियां राज्य ॥
मोठी कीर्ति मिळविली दिधलें लोकांसही सुख *प्राज्य ॥ १९ ॥

ओंव्या.

त्याचा आयुर्दाय कमी झाला ॥ क्षयरोगानें घातला घाला ॥
थेउरगांवीं असतां आला ॥ मरण समय त्या जवळ ॥ २० ॥

साकी.

मरते समयीं माधवरायें सखाराम बापूला ॥

---

*१ पुष्कळ

आणुनि दिवाणगिरिचीं वस्त्रें मानें दिधलीं त्याला ॥ २१ ॥
मुक्त करुनि बहु मानें त्यानें आणविलें काकाला ॥
बदला संभाळावे आतां नारायणरावाला ॥ २२ ॥

आर्या.

नाहीं संतान मला यास्तव माझ्या कनिष्ठ भावाला ॥
मज मागें गादीवर बसवुनि रक्षा तुह्मींच हो त्याला ॥२३ ॥

ओव्या.

ऐसें निरवून भावासी ॥ रायें सोडिलें प्राणासी ॥
सर्व मिळाले थेऊरासी ॥ मरण समयीं तयाच्या ॥ २४ ॥
सन् सत्राशें बाहत्तर ॥ त्याचा महिना नवंबर ॥
तारीख अठरावी तो *वासर ॥ माधवरावाच्या मरणाचा ॥ २५

श्लोक.

रमाबाई त्याची सुगुणखनिकांता कुलवती ॥
पतीच्या सेवेला बहुत जपली शोभनमती ॥
अरे आयुष्याची घडि ह्मणुनि होतां मृत पती ॥
तया संगें गेली धरुनि मनिं धैर्यासचि सती ॥ २६ ॥

ओवी.

माधवरावाचा अंतकाळ ॥ होतां खिन्न झाले सकळ ॥
चित्तीं करिती हळहळ ॥ धनी गेला ह्मणोनी ॥ २७ ॥

---

* दिवस

## नारायणराव आणि रघुनाथराव यांचें वर्णन.

( ई०स० १७७२ पासून सन १७७४ पर्यंत. )

### ओंव्या.

माधवराव मेल्यावर ॥ त्याचा धाकटा सहोदर ॥ नारायण राव चतुर ॥ गादीवर बसविला ॥ १ ॥ राजाराम राजा होता साता ऱ्यास ॥ त्यानें नारायण रावाच्या नांवास ॥ कारभारी हें पद जोडून त्यास ॥ वस्त्रें दिलीं पेशवाईचीं ॥ २ ॥ बजाबा पुरंदऱ्या दिवाण केला ॥ नानाफडणीस फडणीस झाला ॥ सखारामबाप हा पहिला ॥ राहिला कारभारी तसाच ॥ ३ ॥ मुख्य पेशवा नारा यणराव ॥ त्याचा काका रघुनाथराव ॥ उभयतांचा स्नेहभाव ॥ कांहीं दिवस चालला ॥ ४ ॥ रघुनाथरावाची स्त्री आनंदीबाई ॥ आणि नारायणरावाची आई ॥ जिचें नांव गोपिकाबाई ॥ ह्यां[१] दोघींचें पडेना ॥ ५ ॥

### आर्या.

तें कारण दोघांच्या झालें तत्काळ वैमनस्याला ॥
काकानें जें कथिलें नारायणराव मानिना त्याला ॥ ६ ॥
काकानें न करावी गडबड ह्मणऊन कारभाऱ्यांला ॥
फितवून पेशव्यानें स्वप्रतिबंधांत ठेविलें त्याला ॥ ७ ॥
त्या मसलतीस नव्हतें बापूचें मत ह्मणूनिया त्याला[२] ॥
सोडुनि वागूं लागे तत्पक्षाला विरुद्ध *तो झाला ॥ ८ ॥

---

१. सखाभाऊ २. रघुनाथरावाला * बापू

## ओंव्या.

पाहिला बजाबा पुरंदरा ॥ नानाफडणवीस हा दुसरा ॥
हरीपंत फडका तिसरा ॥ हे कारभारी पेशव्याचे ॥ ९ ॥
हे मुख्य कारभारी करून ॥ त्यांजवर विश्वास ठेवून ॥
राज्यकारभार त्यांचे हातून ॥ चालविला पेशव्यानें ॥ १० ॥
ऐसें असतां अकस्मात ॥ नारायणराव वाड्यांत ॥
असतां आपल्या दिवाणखान्यांत ॥ मारेकऱ्यांनीं मारिला ॥ ११ ॥
अठरावें वर्ष वयाला ॥ आठवा महिना राज्याला ॥
असतां पडला घाला ॥ नारायण रावा वरी ॥ १२ ॥
तो प्रकार कसा झाला ॥ अवश्य पाहिजे आयकिला ॥
जरी तो दुःखास्पद लोकांला ॥ तरी थोडक्यांत सांगतों ॥ १३ ॥

## अभंग.

कोणेएके दिवशीं पेशवा जेवूनी ॥ महालीं जाऊनी निजला होता ॥ १४ ॥ एकाएकीं झाली गडबड वाड्यांत ॥ जाहला जागृत तेधवां तो ॥ १५ ॥ मागील वेतन सारें आज घेऊं ॥ तेव्हां आह्मी जाऊं वाड्यांतून ॥ १६ ॥ यापरी बोलत गारदी शिरले ॥ आंगावरी गेले पेशव्याच्या ॥ १७ ॥ नारायण राव भीऊनी पळाला ॥ काकाकडे गेला अभयार्थ ॥ १८ ॥ गारदी सुमेरसिंग लागे पाठी ॥ पेशवा घाली मीठी काकाला तें ॥ १९ ॥ अहो काका माझा वांचवावा प्राण ॥ नाहीं तुह्मांवीण त्राता कोणी ॥ २० ॥ रघुनाथराव सुमेरसिंगास ॥ म्हणे नको यास मारूं

आतां ॥ २१ ॥ बोले शिंग आतां जरी या सोडावें ॥ करूनियां घ्यावें अपुल्या घांता ॥ २२ ॥ आशा सोडोनियां सारा यास दूर ॥ नाहीं तरी ठार व्हाल दोघे ॥ २३ ॥ मिठी सोडवूनी लोटिला *तो दूर ॥ गेला गच्चीवर काका तेंव्हां ॥ २४ ॥ नारायण राव त्यामागें धांवला ॥ ओढोनी पाडीला गारद्यानें ॥ २५ ॥ पेशव्याचा एक इमानी चाकर ॥ चांपा टिळेकर होता तेथें ॥ २६ ॥ धन्यास राखाया धांवूनीयां गेला ॥ पालथा पडला धन्यावर ॥ २७ ॥ सुमेरशिंगानें ते धणी चाकर ॥ एके ठायीं ठार केले दोन्ही ॥ २८ ॥ वाड्यामध्यें तेंव्हां झाला हाहाकार ॥ आकांतही फार झाला तेंव्हां ॥ २९ ॥ कारभारी गेले शोध करायास ॥ पुसावें कोणास म्हणती तें ॥ ३० ॥ काकासी पुसतां कृत्य हें कोणाचें ॥ म्हणे गारद्यांचें वाटे मज ॥ ३१ ॥ पुतण्याचा प्राण घेतला काकानें ॥ निश्चय जनानें केला हाची ॥ ३२ ॥ रघुनाथ रायें बाळहत्या केली ॥ गादी बळकावीली पेशव्याची ॥ ३३ ॥ कारभारी तेंव्हां झालेसारे रुष्ट ॥ म्हणती हा दुष्ट योग्य नाहीं ॥ ३४ ॥ मग रघुनाथ घेऊनी सैन्यास ॥ स्वाऱ्या करायास गेला दूर ॥ ३५ ॥ मागें कारभारी मंडळी मिळाली ॥ मसलत केली निराळीच ॥ ३६ ॥ तेंव्हां गंगाबाई होती गरोदर ॥ पुरंदरावर ठेवीयेली ॥ ३७ ॥ तिच्या नांवें सर्व काम चालविलें ॥ बंदींत घातले प्रतिपक्षी ॥ ३८ ॥ त्या गंगा बाईला झाला जर लेक ॥ गादीचा मालक तोच व्हावा ॥ ३९ ॥ यापरी करोनी विचार

---

* नारायणराव.

बळकट ॥ केला एक कट मंडळींनी ॥ बारेस असतां रघुनाथराव ॥ झाला बाजीराव पुत्र ज्याला ॥ ४० ॥ इकडे गंगाबाई प्रसूत जाहली ॥ पुत्र प्रसवली गुणवंत ॥ ४१ ॥ ऐकोनीयां वार्ता आनंदले जन ॥ म्हणती सुदीन उगवला ॥ ४२ ॥ कारभारि यांनीं होतां एकमास ॥ स्थापीले मुलास गादीवरी ॥ ४३ ॥ सवाइमाधवराव नांव त्याला ॥ ठेवूनी लोकांला कळविलें ॥ ४४ ॥ शुभ वर्तमान ऐकोनियां कानीं ॥ सोडीलें सर्वांनीं राघोबाला ॥ ४५ ॥ रघुनाथराव पदभ्रष्ट झाला ॥ शरण तो गेला इंग्रेजांसी ॥ ४६ ॥

---

## सवाईमाधवराव पेशवा यांचें वर्णन.

(इसवी सन १७७४ पासून सन १७९५ पर्यंत.)

### आर्या.

सन सत्रासें चवरेहत्तर सालीं पुरंदरा वरती ॥
जन्म सवाई माधवरावाचें जाहलें असें म्हणती ॥ १ ॥
तो जन्मतांच पत्रें लिहिलीं राजास[१] कुशल वृत्ताचीं ॥
राजा पासुनि वस्त्रें आणविलीं त्यास पेशवाईचीं ॥ २ ॥
त्यावेळीं मुख्यत्वें करि नाना[२] कारभार राज्याचा ॥
होता सर्वांना यजमानालाहि धाक नानाचा ॥ ३ ॥
साह्यासें मागाया राघोबा इंग्लिशां कडे गेला ॥

---

१ सातारचा राजा. २ नानाफडणीस.

त्यानें त्यांशीं बोलुनि गरजें करितां करार हा केल्या ॥ ४ ॥
जरि मजला गादीवर बसवाल पुन्हा तुम्हांस देईन ॥
साष्टी वसई दोन्ही त्यां बद्दल मी न कांहिं घेईन ॥ ५ ॥

ओंव्या.

मुंबईवाले इंग्लिश यांनीं ॥ राघोबाचा पक्ष धरोनी ॥
सैन्य धाडिलें मुंबईहूनी ॥ पुण्यावर जावया ॥ ६ ॥
ही पेशव्यास बातमी कळली ॥ त्यानें पुण्याहून फौज धाडिली ॥
तळेगांवीं गांठ पडली ॥ उभयतांच्या सैन्यांची ॥ ७ ॥
दोनहजार सैन्य इंग्रजांचें ॥ पंचवीस हजार मराठ्यांचें ॥
होतां युद्ध उभयतांचें ॥ इंग्लिश मागें परतले ॥ ८ ॥

आर्या.

कार्यार्थ इंग्लिशांनीं राघोबाच्या प्रयत्न बहु केला ॥
परित्या राघोबाच्या दुर्दैवें शेवटा न तो गेला ॥ ९ ॥
कलकत्त्याहुन इंग्लिश वकील जो पेशव्याकडे आला ॥
त्याच्याशीं नानाचा तह तो भिमाचि पुरंदरीं झाला ॥ १० ॥
ठरलें कीं साष्टीचा अंमल तो इंग्लिशांकडे द्यावा ॥
त्यांनीं राघोबाचा पक्ष पुढें सर्वथैव सोडावा ॥ ११ ॥

साकी.

राघोबाला कोंपर गांवीं नेउनियां ठेवावें ॥
त्याच्या खर्चाला प्रतिवर्षीं द्रव्य पुरेसें द्यावें ॥ १२ ॥
निराश होउनि तो राघोबा शिंद्याकडेस गेला ॥

गादी मिळवायाचा त्यानें तिकडून यत्न केला ॥ १३ ॥

अभंग.

इतक्यांत कोणी सदोबा नांवाचा॥भाऊसाहेबाचा तो नया झाला१४

ह्मणे तो मी आहें सदाशिवराव॥भाऊसाहेब नांव माझें असे १५

पुण्यांत सर्वांला पडला संशय॥कोणी ह्मणती होय कोणी नाहीं १६

ओंव्या.

पानपताच्या लढाईंत ॥ भाऊसाहेब गेला गर्दीत ॥

त्याचा ठिकाण आजपर्यंत ॥ लागला नाहीं कोणाला ॥ १७ ॥

ह्मणोनियां तो धरून आणिला ॥ चौकशी करितां खोटा ठरला॥

यास्तव बंदींत ठेविला ॥ पेशव्यानें तोतया तो ॥ १८ ॥

तो बंदींतून पळाला ॥ त्यानें बंडावा माजविला ॥

रघूजी आंग्र्यानें धरून दिला ॥ शेवटीं मुकला प्राणास ॥ १९ ॥

तिकडे श्रीरंग पट्टणास ॥ हैदरासवें लढावयास ॥

हरीपंत फडके वगैरे सरदारांस ॥ सैन्य देऊन पाठविलें ॥ २० ॥

इकडे कारभारी मंडळी ॥ फुटोनि झाली दुफळी ॥

एकीनें तया काळीं ॥ पक्ष धरिला राघोबाचा ॥ २१ ॥

त्यामंडळींतील मोरोबाफडणवीस॥ सखारामबापू चिंतोविठ्ठल यांस॥

कैदकरून बंदीस ॥ ठेविलें नानाफडणिसानें ॥ २२ ॥

रघुनाथराव धरून आणिला ॥ कोंपरगांवीं कैदेंत ठेविला ॥

तेथेंच तो निवर्तला ॥ सनसत्राशें ब्यांयशींत ॥ २३ ॥

महादजी शिंदा पुण्यांत राहे ॥ आपलें वर्चस्व स्थापूं पाहे ॥

तें नाना फडणिसास न साहे ।। ह्मणोनि वैमनस्य शिंद्याशीं ।।२४

रघुनाथरावांचे औरस पुत्र दोन ।। बाजीराव चिमणाजी आपा ह्मणून ।।

तिसरादत्तक अमृतरावमिळून ।। शिवनेरी किल्ल्यावर ठेविले ।। २५ ।।

नानानें शिंदा वश केला ।। हिंदुस्थानांत पाठविला ।।

तिकडे त्याचा उत्कर्ष झाला ।। दिल्लीच्याही दरबारीं ।। २६ ।।

साक्या.

वकील मुतलख पदवी नवीन द्यायास पेशव्याला ।।

दिल्लीपतिपासून घेउनी शिंदा पुण्यास आला ।। २७ ।।

करुनी समारंभातें पदवी पेशव्यास ती द्यावी ।।

योजी हें शिंदा कीं अपली थोर वडाई व्हावी ।। २८ ।।

शिंद्याचें तें कृत्य न नाना फडणिसास आवडलें ।।

परंतु शिंद्यापुढें तयाचें त्यावेळीं नच चाले ।। २९ ।।

सुमुहूर्तानें श्रीमंतांला मिरवत अपुल्या नेलें ।।

लष्करांत शिंद्यानें त्यांचें आतिथ्य फारकेलें ।।३०

किनखापी डेऱ्यांत घातली मसनद भरगच्चीची ।।

सदन ठेविली तिजवर ती पदवीच्या अधिकाराची ।। ३१ ।।

तीनवेळ तिस करून मुजरा श्रीमंत जवळ बसले ।।

त्यांला सनदे सह्यां वस्त्रें अलंकारही दिधले ।। ३२ ।।

जामा निमा झगा जरतारी मंदील शाल उंची ।।

कंठी कलगी शिरपेंच तुरा बाहुभूषणें पहुंची ।। ३३ ।।

मोर्तबशिक्के दौत आणखी कलमदान मोर्चेल ।।

एक पालखी एक नालकी तरवार आणि ढाल ॥ ३४ ॥

ओव्या.

घोडा होता जिनाचा ॥ हत्ती होता अंबारीचा ॥

बादशाही निशाणाचा ॥ हत्ती वेगळा होता पैं ॥ ३५ ॥

ह्या वस्तूंचा अंगीकार ॥ करून मानी संतोष फार ॥

वस्त्रें आणि अलंकार ॥ त्याला पेशवा निजांगीं ॥ ३६ ॥

श्रीमंत गादीवर बसले ॥ सर्वांचे मुजरे झाले ॥

नजर नजराणे केले ॥ सरदारांनी समस्तीं ॥ ३७ ॥

शिंद्यानें मोर्चेल घेतलें ॥ श्रीमंतांचे मस्तकावर वारलें. ॥

हरीपंत फडक्यानें धरिलें ॥ दुसरें मोर्चेल श्रीमंतावर ॥ ३८ ॥

ऐसा सत्कार जाहला ॥ मग पेशवा नालकींत बसला ॥

गाजत वाजत आला ॥ समारंभानें पुण्यांत ॥ ३९ ॥

हत्ती घोडे स्वार शिपाई ॥ तोफा बंदुका यांची घाई ॥

अतशबाजी[१] आणि रोशनाई ॥ रस्त्यांत गर्दी मावेना ॥ ४० ॥

श्लोक.

नालकीचा समारंभ पाहून जनबोलती ॥

पाहतों आज हा ऐसा नभूतो नभाविष्यती ॥ ४१ ॥

ओव्या.

पेशवा येतांच राज्यांत ॥ जें लिहिलें सनदेंत ॥

तेंच ठेवून मनांत ॥ पदवी दिधली शिंद्याला ॥ ४२

---

१ दारू उडविणें.

दिलीच्या दरबारीं ॥ महादजी शिंदा कारभारी ॥
पेशव्याचा दस्तगारी ॥ बादशाहा जवळी ॥ ४३ ॥
यापरी महादजी सिंदा ॥ चढला श्रेष्ठत्वाच्या पदा ॥
परितें नानाच्या मनास सदा ॥ विषम वाटे ॥ ४४ ॥
जरी येवढा शिंदा थोर ॥ तरी ह्मणे मी पेशव्याचा चाकर ॥
जोडा उचलण्याचा अधिकार ॥ माझा असे वास्तविक ॥ ४५ ॥
शिंद्यानें आर्जव फार केलें ॥ श्रीमंतांचें मन वळविलें ॥
ह्मणोन नानानें छळिलें ॥ श्रीमंतांस बहुतची ॥ ४६ ॥
जों जों नाना गांजी श्रीमंतांस ॥ तों तों शिंदा आवडे त्यांस ॥
नाना विषयीं मन उदास ॥ श्रीमंतांचें जाहलें ॥ ४७ ॥
नाना बोले श्रीमंतांला ॥ आपण शिंद्याच्या नादीं लागलां ॥
यानें अपाय राज्याला ॥ हें निश्चयें समजावें ॥ ४८ ॥
आतां शिंदाच कारभारी करावा ॥ त्यानेंच कारभार चालवावा ॥
मला जावया निरोप द्यावा ॥ काशियात्रेला ॥ ४९ ॥
तेव्हां पेशवा बोले नानास ॥ तुह्मीं चित्तीं न व्हावें उदास ॥
तुह्मां वरीच माझा विश्वास ॥ आहे पूर्णपणानें ॥५० ॥
तुह्मी सांगाल त्या रीती ॥ मी वागेन निश्चिती ॥
ऐसें बोलून चित्तवृत्ती ॥ शांत केली नानाची ॥ ५१ ॥
तरी शिंद्याचें वर्चस्व वाढलें ॥ नानाचें त्यापुढें न चाले ॥
सर्वांचें लक्ष्य लागलें ॥ शिंद्याकडे त्या वेळीं ५२ ॥
ऐसें असतां अकस्मात ॥ संन सत्रार्शे चवऱ्याणवांत ॥

पुण्याजवळ वानवडी गांवांत ॥ मरण आलें शिंद्यातें ॥ ५३ ॥
पुत्र नव्हता महादाजीबावाला ॥ ह्मणून दौलतराव दत्तक घेतला ॥
तो शिंद्याची गादी पावला ॥ सर्वांच्या अनुमतें ॥ ५४
महादजी शिंद्यास मरण आलें ॥ नानाफडणविसाचें विघ्न टळलें ॥
नानाचें वर्चस्व कायम झालें ॥ पेशव्याच्या दरबारीं ॥ ५५ ॥
हैदराबादेचा मोंगल ॥ निजामअली याकडे मागील ॥
खंडणी मागावयास वकील ॥ पेशव्यानें पाठविले ॥ ५६ ॥
तो ह्मणे आमचीच बाकी ॥ पेशव्याकडे आहे निकी ॥
असें असोन आपली साकी ॥ पेशवा आह्मांस दाखवितो ॥ ५७
हिंमत असेल कांहीं आंगीं ॥ तरी युद्धास यावें आह्मां संगीं ॥
जेव्हां होईल खानाजंगी ॥ तेव्हां तोंड पडेल बाकीची ॥ ५८ ॥
ऐशीं गर्वाचीं भाषणें ॥ ऐकून क्षोभलीं मराठ्यांचीं मनें ॥
मोंगलाशीं युद्ध करावयास जाणें ॥ भाग पडलें तयांतें ॥ ५९ ॥
करावया मोंगलावर स्वारी ॥ केली सैन्याची तयारी ॥
जमविले नामधारी ॥ सरदार सर्व पुण्यास ॥ ६० ॥
दौलतरावशिंदा तुकोजी होळकर ॥ गाइकवाड भोंसले माळेगांवकर ॥
मोठ मोठे जहागीरदार ॥ आले फौजा घेऊनी ॥ ६१ ॥
पटवर्धन रास्ते विंचूरकर ॥ प्रतिनिधी सचीव निंबाळकर ॥
घाडगे चव्हाण पाटणकर ॥ पवार थोरात डफळे ही ॥ ६२ ॥
ऐसें सैन्य जमलें फार ॥ एक लक्ष तीस हजार ॥
शिवाय दहा हजार पेंढार ॥ येऊन त्यांस मिळालें ॥ ६३ ॥

सन सत्राशें पंचाणवांत ॥ जानेवारी महिन्यांत ॥
पेशवा निघाला सैन्या सहित ॥ निजामावर जावया ॥ ६४ ॥
सर्व सैन्याची मुखत्यारी ॥ दिली परशुरामभाऊ याचे करीं ॥
फौजेची व्यवस्था सारी ॥ त्यानें चतुराईनें राखिली ॥ ६५ ॥
पेंढार पुढें पाठविलें ॥ शत्रूचा देश लुटावयास सांगितलें ॥
तोफखाना पुढें चाले ॥ इतर फौज त्यामागें ॥६६ ॥
तिकडे निजामाचें लष्कर ॥ एकलक्ष दहा हजार ॥
जमून आलें खरड्यावर ॥ पेशव्याशीं लढावया ॥६७ ॥
दोहों सैन्यांची गांठ पडतां ॥ युद्ध झालें घोर तवतां ॥
मोंगलांचा मोड होतां ॥ निजाम पळाला किल्ल्यांत॥ ६८ ॥
तेव्हां खरड्याचा किल्ला ॥ मराठ्यांनीं जाऊन वेढला ॥
निजाम अली संकटांत पडला ॥ बोलणें लाविले तहाचें ॥ ६९ ॥
पेशव्याचा जय झाला ॥ निजामाचा तह कबूल केला ॥
आधीं मागून घेतला ॥ मशीर उल् मुल्क वजीर ॥ ७० ॥
मागील खंडणीचा ऐवज भरावा ॥ घेतला मुलूख सोडावा ॥
स्वारीचा खर्च द्यावा ॥ निजामानें पेशव्यास ॥ ७१ ॥
ऐसा तह करूनियां ॥ पेशवा परतला पुण्यास जाया ॥
सर्व सरदार आपापल्या ठाया ॥ निरोप घेऊन निघाले ॥७२ ॥
खरड्याच्या स्वारीस ॥ यश मिळालें पेशव्यास ॥
हें लोकांतें गावयास ॥ कौतुक मोठेंच जाहलें ॥ ७३ ॥

साकी.

जरि खरड्याच्या लढाईंत यश मोठें आलें हातां ॥
तरितो माधवराव पेशवा चित्तीं नाखुष होता ॥ ७४ ॥

श्लोक.

नानाचें भय फार अंतरीं सदा त्या पेशव्याला असे ॥
कांहीं कृत्य करावयास उरलें स्वातंत्र त्याला नसे ॥
बंदोबस्त समस्त लोक अपुले ठेवून राखी असा ॥
ठेवीत्यास मुठींत नित्य अपुल्या कैदेंत कैदी तसा ॥ ७५ ॥

कामदाछंद.

ह्यामुळेंच तो त्रास पावला ॥ जीवही नकोसाच जाहला ॥
राजभोग हीं नावडे तया ॥ राज्यसोडुनी पाहि जावया ॥ ७६ ॥

साकी.

होता बाजीराव ठेविला शिवनेरी किल्ल्यांत ॥
त्यासीं स्नेह करावा ऐसें हा आणी चित्तांत ॥ ७७ ॥
गुप्तपणें दोघांचे निरोप दोघां येती जाती ॥
तुम्ही अम्ही समदुःखी आहों ऐसें दोघेह्मणती ॥ ७८ ॥
सध्यां आपण दोघे आहों नानाच्या कैदेंत ॥
आहों दूर शरीरानें परिराहूं एक मतांत ॥ ७९ ॥
हें कळतां नानाला त्यानें पेशव्यास बहु छळलें ॥
आतां माझी बरी नसे गति ऐसें *त्याला कळलें ॥ ८० ॥

* पेशव्याला.

त्या त्रासानें अंगीं घेतलें माधवरावचें दुखणें ॥
तेव्हां पासुन खरें सोडलें दरबाराला जाणें ॥ ८० ॥

**ओव्या.**

सन सत्राशें शाण्णवांत ॥ अकटोबराच्या महिन्यांत ॥
आला होता दसरा त्यांत ॥ नेविसावे तारखेला ॥ ८१ ॥
तो मोठा सणाचा दिवस ॥ आनंद राजमंडळास ॥
समारंभानें शिलंगणास ॥ पेशवा बाहेर निघाला ॥ ८२ ॥
शिलंगण खेळून वाड्यांत आला ॥ सर्वांचा नजराणा घेतला ॥
अजप्रीसा नाहीं दिसला ॥ पेशवा लोकांस त्या काळीं ॥ ८३ ॥
परी सर्व प्रकारें करून ॥ उदास होतें त्याचें मन ॥
अंगीं कांहीं विकार नसून ॥ मरण संकल्प त्यानें केला ॥ ८४ ॥
पचाविसाव्या तारखेस ॥ संधि पाहत होता मरावयास ॥
तों अकस्मात तयास ॥ बोलावणें आलें काळाचें ॥ ८५ ॥
तिसऱ्या मजल्याच्याखिडकींतूनखालें॥त्यानेंएकाएकींउडीटाकिली॥
कारंज्याची तोटी शिरली ॥ उजव्या मांडींत पेशव्याच्या ॥ ८६ ॥
दुःसाध्य जखम तियेशी ॥ उपाय न सुचे तबीबाशी ॥
पडल्या पासून तिसरे दिवशीं ॥ पेशवा मृत्यु पावला ॥ ८७ ॥
मरतांना बोलला उत्तर ॥ माझे मागें गादीवर ॥
बाजीराव बसवावा हा निर्धार ॥ सर्वांनीं चित्तीं धरावा ॥ ८८ ॥
ऐसें बोलोनि माधवराव ॥ जवळ होता फडका बाबूराव ॥
त्याच्या अंगावर पडोनि जीव ॥ सोडिता झाला तात्काळ ॥ ८९ ॥

अभंग

दुःख झालें सकळांस ॥ नाहीं अंतपार त्यास ॥ ९० ॥

गेला सोडोनि प्राणेश ॥ करी बायको आक्रोश ॥ ९१ ॥

दास दासी आरडती ॥ तोंड ऊर बडवीती ॥ ९२ ॥

कारभारी मंडळीला ॥ समय संकटाचा आला ॥ ९३ ॥

देवाजीच्या मना आलें ॥ तेथें कोणाचें नचाले ॥ ९४ ॥

आर्या.

ह्याच्या दुःखा पेक्षां नाना दुसरीच काळजी वाहे ॥
कीं दरबारीं आतां अपुला मोठेपणा कसा राहे ॥ ९५ ॥

ओंवी.

एकवीस वर्षे राज्य केलें ॥ सवाई माधवराव नाम गाजलें ॥
दुःख कोणा नाहीं दिधलें ॥ आपण भोगिलें जातीनें ॥ ९६ ॥

---

## दुसरा बाजीराव म्हणजे शेवटचा पेशवा.

( इसवी सन १७९६ पासून सन १८१८ पर्यंत. )

ओंव्या.

माधवराव नारायण ॥ हा जेव्हां पावला मरण ॥
तेव्हां पेशवा करावा कोण ॥ हाच विचार चालला ॥ १ ॥

माधवरावानें मरतेवेळीं ॥ सांगितलें होतें बाबूराया जवळी ॥
कीं माझे मागें माझे स्थळीं ॥ पेशवा करावा बाजीराव ॥ २ ॥
आपला शत्रू रघुनाथराव ॥ त्याचा पुत्र बाजीराव ॥
ह्मणोनि त्याशीं द्वेषभाव ॥ नाना धरी सर्वदा ॥ ३ ॥

**आर्या.**

नानाचा मतलब कीं माधवरावाचिया कुटुंबास ॥
दत्तक देऊनि दुसरा शीघ्र करावेंचि पेशवा त्यास ॥ ४ ॥
या गोष्टीला पडलें अनुमोदन भोंसले वगैऱ्यांचें ॥
परि शिंद्याचें नाहीं पडलें त्याच्याहि कारभाऱ्यांचें ॥ ५ ॥

**ओव्या.**

हें ऐकूनि बाजीरावानें ॥ शिंद्याकडे लाविलें बोलणें ॥
मला गादीवर बसविणें ॥ हें काम तुह्मी करावें ॥ ६ ॥
जर मज गादीवर बसवाल ॥ तर चार लक्षांचा मुलूख पावाल ॥
शिवाय स्वारी खर्च होईल ॥ तो मी देईन तुह्मांतें ॥ ७ ॥
ऐकून ह्या वर्तमानासी ॥ भय पडलें नाना फडणविसासी ॥
परशरामभाऊ पटवर्धनाशीं ॥ मसलत केली नानानें ॥ ८ ॥
शिंदा पुढें जें करणार ॥ तें आपणच करावें अगोदर ॥
अशानें बाजीरायावर ॥ वजन पडेल आपलें ॥ ९ ॥
बाजिराव होता शिवनेरीस ॥ त्याकडे पाठविलें परशुरामभाऊस ॥
त्यानें समजाऊन बाजिरावास ॥ पुण्यास सत्वर आणिलें ॥ १० ॥
नाना बाजीराव यांचा एकांत ॥ होऊन ठरलें उभयतांत ॥

झाल्या गोष्टी न ठेवितां मनांत ॥ आपण चालावें एकमतें ॥ ११ ॥
हें शिंद्यास समजलें तें त्यास ॥ फार विषम वाटलें ॥
त्यानें पुण्यावर सैन्य आणिलें ॥ भयप्रदर्शन करावया ॥ १२ ॥
बाजीराव, कैदेंत ठेवावा ॥ चिमणाजी आपा दत्तक द्यावा ॥
आणि तो पेशवा करावा ॥ ऐसे शिंद्यानें योजिलें ॥ १३ ॥
नसतां चिमणाजीच्या मनांतून ॥ यशोबाईच्या मांडीवर बसवून ॥
चिमणाजी माधव नांव ठेवून ॥ त्यास गादीवर बसविलें ॥ १४ ॥
बाजीराव कैदेंत ठेविला ॥ परशुरामभाऊ कारभारी झाला ॥
नानाफडणवीस पळाला ॥ जाऊन राहिला महाडास ॥ १५ ॥
नाना आणि बाजीराव ॥ या दोघांचा गेला ठाव ॥
म्हणूनियां स्नेहभाव ॥ सहज झाला तयांचा ॥ १६ ॥
सर्जेराव घाडग्याचे हातून ॥ शिंदा घेतला वश करून ॥
तसाच मश्रुल् मुल्का करून ॥ निजामअली वश केला ॥ १७ ॥
मग परशुरामभाऊ पटवर्धनाला ॥ कैद करण्याचा बेत केला ॥
हें कळतांच तो पळाला ॥ चिमणाजी आपास घेऊन ॥ १८ ॥
परशुरामभाऊ शिवनेरीस गेला ॥ धरणेकऱ्यांनीं तेथें धरिला ॥
कैद करून पुण्यांत आणिला ॥ स्वाधीन केला रास्त्याच्या ॥ १९ ॥
आणून सर्वांच्या विचारास ॥ सत्ताविसाव्या[2] दिजंबरास ॥
गादीवर बसवून बाजिरावास ॥ नाना झाला कारभारी ॥ २० ॥
मग नानास सारून मागें ॥ शिंदाच कारभार करूं लागे ॥

---

१ शिंद्याचा मेव्हणा. २ सन १७९६ चा.

पेशवाही तसाच वागे ॥ नानाचें कांहीं चालेना ॥ २१ ॥
नानाचा बखेडा मोडावयास ॥ शिंद्यानें कैद केलें नानास ॥
नेऊनियां अहेमदनगरास ॥ त्यास किल्ल्यांत ठेविलें ॥ २२ ॥
मग बाजिरावानें आपला ॥ *कारभार अमृतरावास सांगितला ॥
फौजेचा अधिकार दिला ॥ बाळाजीपंत पटवर्धनास ॥ २३ ॥
पूर्वी बाजिरावानें शिंद्यास ॥ दोन कोट रुपये द्यावयास ॥
केले होते ते फेडावयास ॥ ऐवज नाहीं खजीन्यांत ॥ २४ ॥
ह्मणून सर्जेराव घाडगा ॥ दुसरा बाळोजी कुंजर दांडगा ॥
यांच्या हातून दंगा ॥ पुणें शहरांत चालविला ॥ २५ ॥
गृहस्थ आणि सावकार ॥ तसेच नानाचा पक्ष धरणार ॥
यांस दुःख देऊन फार ॥ बहुत द्रव्य जमविलें ॥ २६ ॥
शिंदा आणि पेशवा यांत ॥ पुढें वैमनस्य आलें बहुत ॥
उभयतांच्या वर्तनांत ॥ कपट होतें ह्मणूनी ॥ २७ ॥

आर्या.

साताऱ्याचा राजा स्वतंत्र झाला तया मिळे *फूस ॥
तो कबज्यांत अणाया सोडियलें परशुराम भाऊस ॥ २८ ॥

साक्या.

तिकडे महादजी शिंद्याच्या तीन बायका होत्या ॥
दौलतराव न ठेवी त्यांचा मान ह्मणुन रुसल्या त्या ॥ २९ ॥
गाऱ्हाणें पेशव्यास अपुलें सांगाया ज्या आल्या ॥

*शिंद्याची.

अमृतराव यानें त्या अपुल्या लष्करांत ठेवील्या ॥ २० ॥
याजमुळें शिंद्यानें नानाफडणीस मुक्त केला ॥
दहालक्ष रुपये शिंद्याला देउनि नाना गेला ॥ २१ ॥

## आर्या.

नानाशीं शिंद्याशीं केलें मग सख्य बाजिरावानें ॥
त्याच्याच आग्रहास्तव पतकरला कारभार नानानें ॥ २२ ॥
सन अठराशें सालीं मार्चीच्या तारखेस तेराव्या ॥
नानास मृत्यु आला त्या दुःखाच्या न गोष्टि बोलाव्या ॥ २३ ॥
होतें द्रव्य अपाराचि परंतु नेलें बरोबर न कांहीं ॥
उरलें तसेंच गेलें परोपकारा कडेस ही नाहीं ॥ २४ ॥

## ओंव्या.

शिंदा आणि होळकर ॥ यांचें शत्रुत्व वाढलें फार ॥
ह्मणून होळकर पुण्यावर ॥ आला सैन्य घेऊनी ॥ २५ ॥
येशवंतराव होळकर ॥ दौलतराव शिंदा तोहि शूर ॥
होतां दोघांचें युद्ध घोर ॥ मोड झाला शिंद्याचा ॥ २६ ॥
पेशवा शिंद्याचा पक्षपाती ॥ मी सांपडेन होळकराचे हातीं ॥
हें भय मानून चित्तीं ॥ पुणें सोडून पळाला ॥ २७ ॥
व्हावया आपुलें रक्षण ॥ गेला इंग्रजांस शरण ॥
त्यांनीं वसईंत नेऊन ॥ स्वस्थपणें ठेविला ॥ २८ ॥
इकडे होळकर पुण्यांत शिरला ॥ उपद्रव कोणा नाहीं दिला ॥
आपले शिपाई ठेवून केला ॥ बंदोबस्त शहराचा ॥ २९ ॥

पेशवा गेला हें पाहून ॥ अमृत रावास बोलावून ॥
आपण गादी सांभाळून ॥ काम चालवा असें म्हणे ॥ ४० ॥
होळकराचा आग्रह अमृत रावास ॥ तरी तो मान्य नकरी त्याकामास
मग त्याच्या पुत्र विनायकराव यास ॥ गादीवर बसविलें ॥ ४१ ॥

साकी.

होळकरानें पुणें शहरच्या लोकांपासुन फार ॥
द्रव्य काढिलें छळून कोंडुन कोणा देउन मार ॥ ४२॥

आर्या.

तिकडे वसईमध्यें जेव्हां तो अडचणींत सांपडला ॥
बाजीराव तयानें तहनामा इंग्रजांसवें केला ॥ ४३ ॥

ओव्या.

दोन पलटणें चाकरीस ठेवावीं ॥ राज्यांत सहा राहूं द्यावीं. ॥
सुरतेची हकदारी सोडावी ॥ मुलूख द्यावा वीस लक्षांचा ॥ ४४ ॥
गायकवाड आणि निजामअली ॥ यांजकडे जी खंडणी राहिली ॥
ती पेशव्यानें आपली ॥ इंग्रजांचे मार्फत मागावी ॥ ४५ ॥
ऐसा तहनामा झाल्यावर ॥ देऊन आपली फौज बरोबर ॥
बाजीराव पेशवा गादीवर ॥ इंग्रजांनीं बैसविला[1] ॥ ४६ ॥
होळकराचा पराभव केला ॥ तो स्वदेशीं घालविला ॥
आमृतरावाच्या मुलाला ॥ आमृतरावाकडे पाठविलें ॥ ४७ ॥
अमृतरावानें बंड केलें ॥ संगमनेर नासिक लुटलें ॥
बाजीरावाराशीं वैर पडलें ॥ समजूत त्याची होईना ॥ ४८ ॥

---

1. सन १८०३ मे महिन्यांत.

मग तो इंग्रजांकडे गेला ॥ यांनीं काशींत नेऊन ठेविला ॥
आठ लक्ष रुपये वर्षाला ॥ देऊं केले तयास ॥ ४९ ॥
इंग्रजांच्या तहापासून ॥ पेशवा मोकळा करावा म्हणून ॥
शिंदा भोसला वगैरे मिळून ॥ इंग्रजांच्या पाठीं लागले ॥ ५० ॥
तितक्यांसही इंग्रज पुरवले ॥ सर्वांशीं तहनामे केले ॥
आपापल्या जागीं बसविले ॥ इंग्रजांनीं चातुर्यें ॥ ५१ ॥
इकडे सदाशिव माणकेश्वर ॥ यास पेशव्यानें दिला कारभार ॥
वकिलीच्या कामावर ॥ इंग्रजांकडे तोच जाई ॥ ५२ ॥
खुसरूजी मोदी इंग्रजांकडील ॥ होता पेशव्याकडे वकील ॥
तो आपला पक्ष धरील ॥ असें केलें पेशव्यानें ॥ ५३ ॥
कर्नल क्लोस गेल्यावर ॥ आला एल्फिन्स्तन साहेब नामदार ॥
इंग्रजांचा वकील मुखत्यार ॥ पेशव्याच्या दरबारीं ॥ ५४ ॥
सर्व सोडून बापूगोखला ॥ फौजेचा अधिकारी केला ॥
त्रिंबकजी डेंगळा झाला ॥ करनाटकचा सुभेदार ॥ ५५ ॥

## आर्या.

इंग्रज लोकांविषयीं बाजीरावाचिया मनीं कपट ॥
होतें तो नसमजला कीं घातक हें कृतघ्नपण निपट ॥ ५६ ॥
तरि इंग्रज लोकांनीं मोडुनियां फंद फितुर बंडावें ॥
केलेंच पेशव्यानें स्वस्थपणें बसुन राज्य भोगावें ॥ ५७ ॥

## ओंव्या.

इंग्रजांच्या आश्रयानें ॥ बारा वर्षें स्वस्थपणानें ॥

राज्य भोगिलें बाजीरावानें ॥ तरी कपट नाहीं सोडिलें ॥ ५८ ॥
युद्धाचें कार्य संपलें ॥ सरदार घरीं बसविलें ॥
मक्तयानें मामले दिले ॥ द्रव्य जमविलें पुष्कळ ॥ ५९ ॥
यज्ञ याग अनुष्ठानें ॥ ब्राह्मणभोजन अनेक दानें ॥
तीर्थयात्रा देवदर्शनें ॥ निरंतर करी पेशवा ॥ ६० ॥
अन्नवस्त्रांचा सुकाळ ॥ भोगी जवळील मंडळ ॥
इतर लोकांस दुष्काळ ॥ ह्मटला तरी शोभेल ॥ ६१ ॥
पुढें गायकवाडाकडून ॥ गंगाधरशास्त्री पटवर्धन ॥
खंडणीचा हिशोब करावा ह्मणून ॥ आला पुण्यास पेशव्याकडे ॥ ६२ ॥
बरोबर घेऊन शास्त्रीबावास ॥ पेशवा गेला पंढरपुरास ॥
तेथें माहाद्वारापुढें त्यास ॥ मारेकऱ्यानें मारिलें ॥ ६३ ॥
तो वहीम आला पेशव्यावर ॥ वाढलें इंग्रजांशीं वैर ॥
इंग्रजांस घालवावें दूर ॥ ही इच्छा धरीली पेशव्यानें ॥ ६४ ॥
युद्धावांचून वेगळी ॥ मग तोड नाहींच राहिली ॥
पेशव्यानें संधि पाहिली ॥ तयारी केली फौजेची ॥ ६५ ॥
सन अठाराशें सत्रा सालीं ॥ इंग्रजांबरोबर लढाई केली ॥
मराठी फौजेची दाणादाण झाली ॥ पेशवा गेला पळोनी ॥ ६६ ॥
बाजीराव साहेब पळत सुटले ॥ इंग्रज त्यांचे मागें लागले ॥
जेथें सांपडले तेथें धरिले ॥ इंग्रजांनीं मराठे ॥ ६७ ॥
नऊ महिने पळतां थकले ॥ निरुपाय होऊनि राहिले ॥
मालकम साहेबास शरण गेले ॥ बाजीरावसाहेब ॥ ६८ ॥

राज्याचा बंदावा लिहून दिला॥ ब्रह्मावर्त ठाव नेमून घेतला॥
इंग्रजांच्या अटकेंत राहिला॥ पुण्यांतील पेशवा॥ ६९॥
स्वारी ब्रह्मावर्तीं राहिली॥ पेशवाई समूळ बुडाली॥
गादी इंग्रजांनीं घेतली॥ सन अटराशें अठरांत॥ ७०॥
आठ कोटीचें राज्य गमावून॥ आठ लक्ष पेनशन घेऊन॥
स्नानसंध्यादि कर्मे आचरून॥ ऋषिमार्ग पतकरला॥ ७१॥

**आर्या.**

कपट न करितां इंग्लिश लोकांशीं बाजिराव तरि त्याची॥
गादी कायम असती संततिही राज्यभोगिती साची॥ ७२॥

**गीत.**

झाला पेशव्याचा अस्त॥ भया पावले समस्त॥
इंग्रजांनीं बंदोबस्त॥ करुनि सुख दिधलें॥ ७३॥
पेशव्यासाठीं कोणी रडती॥ कोणी टळली पीडा ह्मणती॥
आलों इंग्रजांच्या हातीं॥ आतां भय नाहीं॥ ७४॥

---

## पोंवाडा इंग्रेजी राज्याचा.

क्षमातळीं इंग्लिशां सारखा प्रभु नाहीं दुसरा॥
घ्या सुख आतां दुःखें पहिलीं सर्व तुह्मी विसरा॥ ध्रुवपद॥
शके सत्राशें एकुणचाळिस कार्तिक मासांत॥
इंग्लिश यांनीं गादी स्थापिली पुणें शहरांत॥
अभय दिलें लोकांस फिरविली द्वाही नगरांत॥

बंदोबस्ता उभे शिपाई पेठो पेठांत ॥
नाहिं कुणाच्या घरा उपद्रव फिरतां रस्त्यांत ॥
समाधान वाटलें प्रजेला निर्भय चित्तांत ॥
धुमाळ ॥ शहरांतिल सारे संभावित मिळविले ॥
चित्तांतिल त्यांच्या सर्व धाक पळविले ॥
आपुल्या मनांतिल अभिप्राय कळविले ॥
चा०प० ॥ असाच गांवो गांवीं प्रांतो प्रांतीं क्रम सारा ॥
करुनि प्रजा सुखविली उतरिला जमिनीचा सारा ॥ १ ॥
क्षमातळीं० ॥
वतन जहागिर इनाम वर्षासन हीं चालविलीं ॥
कितीकांस पेनशनें नवनवीं करुनियां दिधलीं ॥
देवस्थानें धर्मादायहि तशींच राखविलीं ॥
ह्या देशांतिल सर्वजनांचीं दुःखें संपविलीं ॥
पराक्रमानें राज्यें सारीं क्षणांत हालविलीं ॥
सुख देउनि लोकांत आपलीं नांवें गाजविलीं ॥
धुमाळ ॥ हें सैन्य सुशिक्षित कवाईत मोठी ॥
भरपूर खजीना नव्हे कदा खोटी ॥
समुद्रांत चालविल्या अगिन बोटी ॥
चा०प० ॥ अगिनगाडिची नवीच हिकमत काढियली चतुरा ॥
जलद बातमी द्यायाचहुकडे लावियल्या तारा ॥ २ ॥
क्षमातळीं० ॥
जिकडे तिकडे असे सुबत्ता भय नाहिं कोणाचें ॥
ठेवुनि उघडें दार निजावें खुशाल सदनाचें ॥

जमिन मोजणी सडका तलाव पुल ह्या कामांचें ।
गणित नसे पैक्याचा होतो खर्च किती त्याचें ॥
न्याय कोडतें स्थापियलीं हित व्हाया लोकांचें ॥
शाळा विद्यालयें माजलें खातें विद्येचें ॥

धुमाळ ॥ विद्या प्राशुनि हुद्दे बहु दिधले ॥
नेटीव जनांचे पगार वाढविले ॥
व्यापारहि दुप्पट तिप्पट भरभरले ॥

चा०प०॥ कला कुशलता फार वाढली यावर करा नजर क्षमातळीं०॥
विद्वानाची आवड मोठी देती त्या असरा ॥ ३ ॥
क्षमातळीं० ॥
पहिला राजा जाउनि दुसरा राजा जो येतो ॥
जाळुनि पोळुनि लुटुन प्रजेचा समाचार घेतो ॥
तसा नव्हे हा प्रभू प्रजेची दया मनीं धरितो ॥
इहपरलोकीं सौख्य व्हावया यत्न फार करितो ॥
न्यायानें वागतो तोच या राज्यामधिं तरतो ॥
अन्यायें वर्ततां सहज मग दुःखार्णविं पडतो ॥

धुमाळ ॥ अशा प्रभुस कल्याण सदा व्हावें ॥
असेंच राज्य हें अखंड चालावें ॥
हेंच ईश्वरापाशीं मागावें ॥

चा०प० ॥ होतां प्रभुकल्याण आपुल्या सुख येतें पदरा ॥
म्हणतो कवि सज्जनहो हरिला तुम्ही पदर पसरा ॥ ४ ॥
क्षमातळीं इंग्लिशां सारखा प्रभु नाहीं दुसरा ॥
घ्या सुख आतां दुःखें पहिलीं सर्व तुम्ही विसरा ॥

---